

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका





श्री

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक २१. अंक १११०.

## मराठी व्याकरणावर विचार.

### निबंध २ रा.

### व्याकरणाचे विभाग.

व्याकरणाचे विभाग दादोबांनी **वर्णविचार**, **शब्दविचार** आणि **वाक्यरचना**, असे तीन केले आहेत. कितीकांनीं **शब्दविचार** आणि **वाक्यरचना** असे दोनच केले आहेत. विभाग दोनच करावे, किंवा तीन करावे, याविषयीं आमचा मोठासा आग्रह नाहीं. तथापि त्या विभागांमध्यें 'शब्दविचार' असा जो विभाग केला आहे त्याच्या नांवाविषयीं आह्मांला मोठी अडचण वाटते. याविषयीं पुढें आह्मीं विशेष लिहिणार आहों. दुसरी गोष्ट. इंग्रजी व्याकरणामध्यें 'word वर्ड्' अशी जी संज्ञा आहे, तिचें भाषांतर करून मराठीमध्यें 'शब्द' ही संज्ञा सरसकट घेतली असावी असें दिसतें. परंतु हें योग्य नव्हे. इंग्रेजीमध्यें मूळशब्द आणि विभक्त्यंत शब्द या दोहोंलाही 'वर्ड्' ही संज्ञा चालते; परंतु मराठीमध्यें संस्कृताच्या आधारानें 'शब्द' आणि 'पद' अशा दोन भिन्न भिन्न संज्ञा फार उत्तम असतां, पद आणि शब्द, यांमध्यें अभेद मानून, अथवा सर्वथा 'पद' संज्ञेचा तिरस्कार करून 'शब्द' संज्ञाच सर्वत्र योजल्यामुळें उगाच गोंधळ झाला आहे. याविषयींही पुढें विशेष लिहिणार आहों.

या प्रकरणाच्या आरंभीं वर्णविचार लिहिण्याचा संप्रदाय आहे, तो वेगळा काढला, किंवा आहे तेथेंच ठेविला तरी बाध नाहीं.

'वर्ण' याला इंग्लिश शब्द "letter लॅटर्." परंतु लॅटर शब्दाचें जें लक्षण, तें 'वर्ण' शब्दाला लावणें नीट नाहीं. मराठी व्याकरणामध्यें 'वर्ण' ह्मणजे भाषेला आधारभूत जे स्पष्ट मूलध्वनि ते, असा मूळचा अर्थ; आणि त्याच्या अनुषंगानें, त्यांचीं दर्शक जीं लिखित चिन्हें त्यांनाही वर्ण ह्मणतात. पण इंग्रजीमध्यें तसें नाहीं. त्या चिन्हांनाच मुख्यत्वें 'लॅटर' ह्मणतात. हा भेद लक्षांत न आणितां, जोशीबोवांनीं इंग्लिश रीतीनें वर्णशब्दाचें लक्षण दिलें आहे तें असें—

" भाषेचे मूळ ध्वनी आहेत; हे ध्वनी ज्या चिन्हांनीं दाखवितात, त्यांस वर्ण असें ह्मणतात." (पृ० १). यांत चिह्नांलाच वर्णत्व दिलें आहे, हें योग्य नाहीं. यांत पुनः वाक्यरचना चमत्कारिक आहे. ' भाषेचें मूळ ध्वनी आहेत', यांत कर्तृपद कोणतें, याची भ्रांति उत्पन्न होते. 'मूळ' हें कर्तृपद मानावें, तर 'आहेत' हें क्रियापद अनेकवचनीं असल्यामुळें त्याला जुळत नाहीं. 'ध्वनी' कर्ता मानावा,



तर वाक्यारंभीं तो नाहीं. कोणीकडूनही पाहिलें, तरी वाक्य फार बोजड दिसतें. गोडबोल्यांनींही हेंच वाक्य योजिलें होतें; पण या वाक्याचा अर्थ स्पष्ट होत नाहीं. या कर्तृपदाच्या संबंधानें, संस्कृत वाक्यरचनेची पद्धति पाहतां, "गुणाः पूजास्थानं अस्ति" हें वाक्य अशुद्ध आहे. एथें उद्देश्यरूपकर्त्याला अनुसरूनच क्रियापद असलें पाहिजे. (आपटेकृत संस्कृत वाक्यरचना, द्वितीयावृत्ति, पृ. ६ पहावें.) मराठींतही, "इंग्रजीभाषा आजकाल उदरनिर्वाहाचें साधन झाली आहे," इत्यादि प्रकारची योजना प्रत्यक्ष आहे. जर पुढील शब्दाप्रमाणें क्रियापद पाहिजे, तर तेथें **हा ही हें** यांतून एकादें दर्शक सर्वनाम योजलें पाहिजे. जसें, "इंग्रजीभाषा हें आजकाल उदरनिर्वाहाचें साधन झालें आहे," इ०.

वर्णाचे भेद दोन, स्वर आणि व्यंजनें. त्यांत 'ज्या वर्णांचा स्वतंत्रपणें पूर्ण उच्चार होतो ते स्वर.' आणि 'ज्या वर्णांचा उच्चार पूर्ण होण्यास स्वराचें साह्य घ्यावें लागतें तीं व्यंजनें.' हीं लक्षणें कशीं तरी चालतील; पण, "व्यंजनास स्वतंत्र उच्चार आहेत. परंतु त्यांत स्वर मिळाल्याखेरीज त्यांचा उच्चार तोंडावाहेर येत नाहीं," हा लेख पाहून चमत्कार वाटतो. 'थीबा राजा स्वतंत्र आहे, पण इंग्लिश सरकारच्या परवानगीवांचून त्याली वाहेर फिरतां येत नाहीं,' अशा सारखेंच हें वाक्य आहे.

ले. ७. ह्रस्वस्वर दीर्घस्वर, आणि संयुक्तस्वर, यांचीं लक्षणें जोशीबोवांनीं मुळींच दिलेलीं नाहींत. आणि त्यांच्या लेखावरून संयुक्तस्वर हे ऱ्हस्व आणि दीर्घ यांच्या बाहेरचे आहेत, अशी शंका येते. परंतु तेही दीर्घच आहेत, हें त्यांनीं सांगितलें पाहिजे होतें. ऱ्हस्व ह्मणजे तोकडा, दीर्घ ह्मणजे लांब आणि संयुक्त ह्मणजे मिश्रित,' हें सांगितलें पाहिजे होतें, आणि हे कसे मिश्रित आहेत याचा उलगडा संधिप्रकरणीं होईल, असें ही कळविलें पाहिजे होतें. ह्रस्व आणि दीर्घ यांचें मान स्पष्ट सांगितलेलें नाहीं. ऱ्हस्वाच्या दुप्पट दीर्घ ह्मटल्यानें, निर्णय होत नाहीं. कां कीं, ऱ्हस्वाचेंच आधीं मान ठाऊक नाहीं. कु कू कू३ असे जे कोंबड्याच्या अरवण्यामध्यें तीन शब्द होतात, त्यांत दिसणारे उ ऊ ऊ३ हे तीन स्वर क्रमें करून ऱ्हस्व दीर्घ आणि प्लुत (ह्म. फार दीर्घ) यांचें बिनचूक प्रमाण दाखवितात, असें संस्कृत व्याकरणांत स्पष्ट सांगितलें आहे, आणि हेंच प्रमाण आमचे मराठी वैयाकरण स्वीकारते. तर चांगलें होतें.

ले. ९. अंतःस्थवर्ण आणि ऊष्मवर्ण या शब्दांचा अर्थ काय ? हें सांगितलें पाहिजें होतें. 'अंतःस्थ' ह्मणजे संस्कृत वर्णमालेमध्यें स्वर आणि वर्गीय यांच्यामध्यें सांगितलेले. आणि 'ऊष्म' ह्मणजे उष्णता उत्पन्न करणारे अर्थात् प्रखर उच्चाराचे. अंतःस्थास जोशीबोवांनीं दिलेली 'अर्धस्वर' ही संज्ञा इंग्रजींतील 'Semivowel सेमिव्हॉवेल्' याशब्दाचें भाषांतर आहे.

ले. १०. 'ङ्' हें व्यंजन शुद्ध मराठी शब्दांत येत नाहीं असें जोशीबोवांचें ह्मणणें; परंतु 'ढंग' 'पांगारा' यांत ङ् आहे. भेद इतकाच कीं तो बिंदुरूपानें लिहितात.

'ळ्' हें व्यंजन फक्त मराटींतच येतें, यांत 'फक्त' आणि 'च' या दोहोंपासून विशेष अर्थ कोणता ? तें असो. पण 'ळ' हें अक्षर मराठीशिवाय इतर भाषांत आहे. वेदांमध्यें आहे, कानडींत आहे, तेलंगी, मद्रासी, गुजराथी, इत्यादि अनेक भाषांत आहे.




अनुक्रमणिका

ले. १२. "पुष्कळ वेळा ( ? ) एकापेक्षां अधिक व्यंजनें एकत्र मिळून मग त्यांत स्वर मिळतो, त्यांस **जोडाक्षरें** किंवा **संयुक्तव्यंजनें** असें ह्मणतात; उदा० क्त, प्र, र्ग, क्ष, म्न, ध्म, ट्र, इ०." पण जोडाक्षरें तींच संयुक्त व्यंजनें काय? क्त, प्र, इ० संयुक्त व्यंजनें आहेत, असें नवीनच समजतें!

ले. १३. यांत **कठोर** आणि मृदु असे व्यंजनांचे भेद केले आहेत. पण हीं इंग्रजींतील hard हार्ड् आणि soft सॉफ्ट् यांचीं भाषांतरें होत. यांना संस्कृतव्याकरणांतील फार उत्तम संज्ञा अनुक्रमें **श्वासवर्ण** आणि **नादवर्ण** या आयत्या होत्या. पण त्यांकडे लक्ष दिलें असतें तर.

ले. १५. "पांच वर्गांतील शेवटलीं व्यंजनें, ज्यांचा उच्चार नाकांतून होतो, त्यांस अनुनासिक व्यंजनें ह्मणतात." यांत 'ज्यांचा' हा इंग्लिश प्रकार सोडून तेथें 'यांचा' असें घातलें असतें तर बरें होतें. अशींच वाक्यें अनेक ठिकाणीं आलीं आहेत. पहा. ले. ३७. "एक किंवा अनेक वर्णांचा समुदाय, ज्यापासून कांहीं अर्थ समजतो, त्यास **शब्द** असें ह्मणतात." ले. ९४. "सर्व ऱ्हस्वइकारांतनामें, ज्यांचा स्वर दीर्घ होतो." इ०.

ले. १५ "त्यांच्या (ह्म० अनुनासिक व्यंजनांच्या) उच्चाराचा संक्षेप दाखविण्याकरितां ( ं ) या चिन्हाची योजना करितात, त्यास **अनुस्वार** ह्मणतात. उदा० कां, तूं, तळें, तंटा, पंडित इ०." एथें कां, तूं, तळें, यांत तर अनुस्वार मुळींच नाहीं. असा अनुनासिक आणि अनुस्वार यांचा गोंधळ उपयोगी नाहीं. अनुनासिक स्वर वेगळे न सांगितल्यामुळें हा गोंधळ उत्पन्न झाला आहे. 'अनुस्वार' हें एक वेगळें व्यंजनच आहे असें मानण्यास बाध नाहीं. परंतु 'अनुनासिक' यामध्यें तसा कांहीं प्रकार नाहीं. ङ् ञ् ण् न् म् हीं व्यंजनें अनुनासिक होत. त्यांमध्यें अनुनासिकत्व ( ह्मणजे नाकाच्या साहाय्यानें उच्चार होणें हा एक धर्म) आहे. परंतु त्या धर्माला वेगळें व्यंजन ह्मणतां येणार नाहीं. तोच धर्म कोणत्याहि स्वरांमध्यें पाहिजे तर आणतां येतो; आणि जेव्हां तो धर्म एकाद्या स्वरामध्यें आणिलेला असतो, तेव्हां त्या स्वराला 'अनुनासिक' ही संज्ञा लागते. मराठी शब्दांमध्यें अक्षरावर जो बिंदु येतो, त्याला सरसकट 'अनुस्वार' किंवा सरसकट 'अनुनासिक' संज्ञा लावतां येणार नाहीं. यासाठीं त्याला '**बिंदु**' हीच संज्ञा चांगली आहे. **संयोग, संरक्षण, संलाप, संवाद, अंश, कंस, सिंह,** या शब्दांमध्यें शुद्ध अनुस्वार दाखविण्याकरितांच हा बिंदु लिहिलेला असतो. **शंका, पंच, दंड, अंत, रंभा,** यांमध्यें क्रमेंकरून ङ् ञ् ण् न् म् या व्यंजनांच्या स्थानीं बिंदु योजिले आहेत; आणि **कां, कोठें, नांव, गांव, आलों,** इत्यादि शब्दांमध्यें स्वराचें अनुनासिकत्व दाखविण्यास्तवच बिंदु योजिलें आहेत. अशी ही बिंदूची तीन प्रकारची योजना स्पष्ट केली पाहिजे. उगाच गोंधळ कामाचा नाहीं. अनुनासिकत्व हा धर्म स्पष्ट दाखवायाचा असतां, नुसता बिंदु न देतां, ँ असा अर्धचंद्रयुक्त बिंदु देतात हेंही सांगितलें पाहिजे होतें. परंतु अशी कांहींच व्यवस्था न केल्यामुळें, अनुस्वाराचा उच्चार कोठें 'केवळ नाकांतून होतो,' अशा प्रकारचे विलक्षण लेख आले आहेत.

ले. २१. विसर्गाला सकारयुक्त किंवा हकारयुक्त उच्चार ह्मटलें आहे. परंतु तेथें 'अर्धसकारसदृश' ह्मणजे अर्धसकारासारखा, असें पाहिजे होतें.



ले. २२. " वर्णमालेंतील वर्णांचे उच्चार मुखाच्या निरनिराळ्या भागांत (?) उत्पन्न होतात. " वर्णमाला ह्मणजे काय हें सांगितलें नाहीं. वर्णमालेबाहेर आणखी कोणते वर्ण राहिले?

येथेंच खालीं टीप देऊन ह्मटलें आहे कीं, " मराठीभाषेंत च् छ् इ० वर्णांचा उच्चार दोन प्रकारचा होतो. " परंतु च् ज् झ् यांचा मात्र दोन प्रकारचा उच्चार आहे, छचा नाहीं. मुखाच्या निरनिराळ्या भागांपासून वर्णांची उत्पत्ति कसकशी होते हें सांगण्यास संस्कृत व्याकरणाचें फार उत्तम साधन होतें, पण याकडे कोणीही लक्ष दिलें नाहीं. आह्मीं एथें तें सांगत बसण्यापेक्षां सिद्धांतकौमुदीचा हवाला द्यावा हें बरें वाटतें.

'कंठौष्ठस्थान', आणि 'दंतौष्ठस्थान' यांच्या स्थळीं सोप्या उच्चाराचे ' कंठोष्ठस्थान ' आणि ' दंतोष्ठस्थान ' असे शब्द घातले असते , तर अयोग्य झालें नसतें.

## संधि.

हें संधिप्रकरण, निदान संस्कृत संधिप्रकरण तरी, मराठी व्याकरणाच्या आरंभीं घालण्यापासून कांहीं लाभ नाहीं , शिकणारांना त्रास मात्र उत्पन्न होतो , ही गोष्ट आमच्या वैयाकरणांच्या ध्यानांत अद्यापि कशी भरत नाहीं, कोणजाणे?

सर्व ह्रस्व इकारांत आणि ह्रस्व उकारांत संस्कृतशब्द जोशीबोवांनी दीर्घान्त लिहिण्याची रीति घातली आहे. परंतु ती मान्य करण्यापासून लाभापेक्षां हानि विशेष आहे असें आह्मांस वाटतें. याचें कारण पुढें विभक्तिप्रकरणीं स्पष्ट करूं. सध्यां त्यांनीं लिहिलेला ' संधी ' हा शब्द आमच्या लेखांत तरी 'संधि' असाच चालू पद्धतीला अनुसरून आह्मीं लिहितों.

ले. २३. "दोन वर्ण एका जागीं आले असतां त्या दोहोंच्या जागीं दोहोंपैकीं एक किंवा अगदीं निराळाच वर्ण येतो, त्यास **संधी** असें ह्मणतात. " परंतु हें लक्षण योग्य नाहीं.

दोन वर्ण एका जागीं कसे येतील? एथें ते परस्परांच्या समीप येतील असा लिहिण्याचा अर्थ असावा; परंतु तो स्पष्ट करायाचा होता. ' संधि ' शब्दाचें लक्षण संस्कृतांत स्पष्ट आहे. ' परः संनिकर्षः संहिता. ' ह्मणजे, मध्यें अवसान न घेतां वर्णांचा उच्चार करणें याचें नांव **संधि** ; आणि या संधीच्या निमित्तानें त्या वर्णांला जे कांहीं विकार होतात त्यांचें नांव **संधिकार्य**. वस्तुतः बाराखड्या आणि जोडाक्षरें हेही संधिच आहेत. परंतु त्यांमध्यें कांहीं विशेष कार्य घडत नसल्यामुळें ते या प्रकरणांत सांगितले नसतात, इतकेंच. समासादि कारणांमुळें भिन्न पदांचें सांनिध्य जेथें घडतें तेथें प्रायः कांहीं तरी विशेष प्रकार घडत असतो, ह्मणून तितक्यापुर्ताच त्यांत संग्रह केलेला असतो. तथापि याहून भिन्न प्रसंगीं, ह्मणजे एकाच पदांतील वर्णांमध्यें, प्रत्ययादिकांच्या निमित्तानें किंवा कांहीं भिन्न कारणानेंही जीं कार्यें होतात, तींही संधिप्रकरणांत येतातच. ह्मणून ' संधि ' शब्दाचें लक्षण सांगतांना या सर्व गोष्टी अवश्य ध्यानांत टेविल्या पाहिजेत.

" संधी संस्कृत शब्दांत मात्र होतात, व केव्हां केव्हां शुद्ध मराठी शब्दांतही संधी होतात, " असें जोशीबुवांनीं ह्मटलें आहे. परंतु जर संस्कृत शब्दांत मात्र संधि होतात, तर मराठी शब्दांतही ते कसे आले?

ले. २४. ' दोन स्वर एकत्र आले असतां जो संधी होतो तो स्वरसंधी, ' ही व्याख्या ठीक आहे. परंतु ' दोन व्यंजनें एकत्र येऊन जो संधी होतो तो व्यंजनसंधी, ' असें ह्मटलें आहे, तेथें मात्र अडचण येते. ' जगत् आधार ' यांचा संधि ' जगदाधार ' असा झाला;



हा व्यंजनसंधि खरा. पण एक व्यंजन आणि त्या पुढें एक स्वर यांचा येथें संधि आहे. दोन्ही व्यंजनें नाहींत. ह्मणून व्यंजनापुढें दुसरें व्यंजन किंवा स्वर आला असतां जो संधि होतो तो व्यंजनसंधि होय.

ले. २५. 'संकृत भाषेंत स्वरास 'अच् अशी संज्ञा आहे' आणि 'व्यंजनास (ले. २८) हल् अशी संज्ञा आहे.' परंतु या संज्ञा कशा उपन्न झाल्या याविषयीं कांहीं तरी 'प्रौढ व्याकरणासारख्या ग्रंथांत सांगणें अवश्य होतें.'

ले. २९ "संयुक्त स्वर शिवाय करून कोणतेही दोन सजातीयस्वर एकापुढें एक आले असतां, ते ऱ्हस्व असोत किंवा दीर्घ असोत, **त्यांचा संधी त्यांच्याच दीर्घस्वरांत होतो.**"

'मराठी व्याकरण' ह्मटलेल्या ग्रंथामध्यें अशा प्रकारचीं वाक्यें पाहून आह्मांला फार वाईट वाटतें. पुनःपुनः आमच्या दृष्टीसमोर असलीं वाक्यें आलीं ह्मणजे आह्मी भयाभीत होतों. पण पुढील वाक्य पाहा.—

ले. ३६. "प्रत्यय लावितांना अमुक प्रत्यय लागतो असें सांगितल्यावर तो प्रत्यय जर स्वरादि (स्वर ज्याचे आरंभीं आहे असा) असेल तर विशेष प्रकार सांगितला नसल्यास ज्या शब्दास प्रत्यय लावायाचा, त्याचा अंत्यस्वर असेल तो नाहींसा होतो; किंवा पररूप संधी होतो असें साधारणतः समजावें. तसा प्रकार होत नसेल तेथें स्पष्ट उल्लेख केला आहे." काय भयंकर वाक्य हें! पुष्कळ विचार केल्यानंतर मोठ्या खटपटीनें यांतून इतकाच अर्थ घ्यायाचा कीं— शब्दापुढें स्वरादिप्रत्यय आला असतां तेथें प्रायः पररूपसंधि होतो; पण जेथें भिन्न संधिप्रकार असेल तेथें तो स्पष्ट सांगितला आहे. धन्य आहे त्या संस्कृत वैयाकरणांची, कीं ज्यांचे शब्द ह्मणजे जशीं मुक्ताफळें. नेमकी योजना आणि नेमका अर्थ. असो, प्रस्तुत विषयाकडे वळूं—

प्रथमतः 'सजातीय' स्वर ह्मणजे काय, 'विजातीय' स्वर ह्मणजे काय हें सांगितलें पाहिजे होतें. परंतु तें कांहींच नसतां त्या शब्दांची योजना केल्यानें उगाच संदेह मात्र उत्पन्न होतो. संयुक्त स्वरांमध्यें परस्पर सजातीयत्व नाहीं. तेव्हां 'संयुक्त स्वर शिवाय करून' असें ह्मणण्याचें मुळींच प्रयोजन नव्हतें.

अ आ हे परस्पर सजातीय (अथवा सवर्ण); त्याप्रमाणेंच इ ई; आणि त्याप्रमाणेंच उ ऊ; आणि त्याप्रमाणेंच ऋ ॠ; हे परस्पर सजातीय आहेत. सजातीय ह्मणजे समानस्थानीं समानप्रयत्नानें उत्पन्न होणारे. आणि असे नव्हेत ते विजातीय (अथवा असवर्ण.) हें प्रथमतः सांगितलें पाहिजे होतें. ह्रस्वदीर्घादि जो केवळ कालकृत भेद आहे त्यापासून सवर्णत्वाला बाध येत नाहीं. त्याप्रमाणेंच व्यंजनांमध्यें श्वासवर्ण नादवर्ण अनुनासिकवर्ण असा जो हा अंतरंग भेद, तेणेंकरूनही सवर्णत्वाला बाध येत नाहीं, हो गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे.

'त्यांचा संधी त्यांच्या दीर्घस्वरांत होतो,' असें महाराष्ट्रपद्धतिविरुद्ध वाक्य न योजतां—'त्या दोहोंच्या स्थानीं मिळून त्यांचा दीर्घ असा एकच स्वर येतो.' असें वाक्य घातलें पाहिजे होतें.

या संधिप्रकरणामध्यें जोशीबुवांनीं जे अनेक नियम दिले आहेत, त्यांचा तात्पर्यांश जरी फारसा चुकीचा नाहीं, तथापि त्यांतील शब्दरचना फार द्राविडीप्राणायामाची आहे, असें ह्मणणें प्राप्त होतें.

वाङ्मन, षण्मास, जगन्नाथ, यांच्या स्थानीं वाग्मन, षड्मास, जगद्नाथ, अशीं रूपें संस्कृत ग्रंथांतही आढळत नाहींत, आणि म-



राठी प्रचारांतही नाहींत. असें असतां संस्कृत व्याकरणामध्यें तीं वैकल्पिक मानलेलीं आहेत एवढ्यावरूनच, कित्येक आग्रही परीक्षकांच्या संतोषास्तव जर त्यांचा मराठी व्याकरणांतही संग्रह करण्याचा असला तर, हवा तर विचारा करावा. परंतु असलीं कठीण रूपें प्रचारांत मुळींच नाहींत. ह्मणून मराठी व्याकरणांतून तरी तीं साफ गाळून टाकणें हेंच योग्य असें आह्मांला वाटतें.

तेथेंच पुढील दोन्ही नियमांत 'संनिध' हा शब्द आला आहे. तो संस्कृत व्याकरणांतही त्याप्रसंगीं दिला आहे खरा. परंतु तेथें पाणिनीय सूत्रांच्या ओघाकडे लक्ष देऊन उत्सर्ग आणि अपवाद यांच्या जुळणीसाठीं वृत्तिकारांना तो शब्द घालावा लागला आहे, इतकेंच. वस्तुत: "पुढें श किंवा चवर्गवर्ण आल्यास, स् आणि तवर्गवर्ण यांच्या स्थानीं क्रमश: श् आणि चवर्गवर्ण होतात," इतका नियम पुरे आहे. हाच प्रकार पुढील नियमामध्येंही लागू होतो. गुण, वृद्धि, आगम, आदेश इत्यादिकांच्या व्याख्यांमध्येंही नियत शब्दयोजना असती तर बरें होतें. "इ उ ऋ ऌ यांचे अंतस्थवर्ण अनुक्रमें य् व् र् ल् हे आहेत," ह्मणजे काय, हें स्पष्ट नाहीं. तथापि य् व् र् ल् यांच्या स्थानीं इ उ ऋ ऌ येणें याला **संप्रसारण** ही संज्ञा संस्कृतांतल्या प्रमाणें जोशीबुवांनीं दिली हें बरें केलें. दादोबांनीं सोयीकरितां ह्मणून इ उ ऋ ऌ यांच्या स्थानीं य् व् र् ल् येणें याला **संप्रसारण** संज्ञा केली होती; परंतु तसें करण्याची कांहीं आवश्यकता होती असें दिसत नाहीं.

## शब्दविचार.

ले. ३७. 'एक किंवा अनेक वर्णांचा समुदाय, ज्यापासून कांहीं अर्थ समजतो, त्यास शब्द असें ह्मणतात.' हें शिथिलवाक्य आहे; कारण 'कीं अनेक वर्णांचा समुदाय होऊं शकेल; पण एकच वर्णाचा समुदाय तो कसा?

शब्दाला अर्थ असणें हें प्रक्रियेच्या कारणानें जरी अवश्य आहे, तरी व्याकरणामध्यें केवळ अर्थशून्य ध्वनीलाही शब्द ह्मणतच नाहींत असें समजूं नये. इतकाच भेद कीं, सार्थ शब्दापासून मात्र स्वतंत्रपणें पदसिद्धि होऊं शकते, तशी अर्थहीन शब्दापासून होऊं शकत नाहीं. अर्थहीन शब्दालाही आधीं सार्थत्व द्यावें लागतें. ह्मणून सार्थशब्दाला विशेषें करून 'शब्द' ही संज्ञा लावितात.

जोशीबुवांनीं आणि दुसऱ्या व्याकरणकारांनींही शब्दांचे भेद दोन प्रकारचे दाखविले आहेत. एक त्यांच्या उत्पत्तीवरून, आणि एक व्याकरणांतल्या त्यांच्या उपयोगावरून. पण हा गोंधळ आहे. उत्पत्तीवरून ह्मणून जो भेद मानिला आहे, त्याचा जर व्याकरणांत उपयोग नाहीं, तर तो भेद व्याकरणांत दिला कशाला? संस्कृत व्याकरणामध्यें या प्रकरणाची जी व्यवस्था केली आहे ती प्रशस्त आहे. ह्मणून एथें तिचें थोडेंसें दिक्प्रदर्शन करूं:—

जितके ह्मणून भाषेमध्यें शब्द आहेत, तितके सर्व निवडून काढून, त्यांचीं अगदीं मुळचीं स्वरूपें कोणचीं असावींत, हें वैयाकरणांनीं मोठ्या प्रयत्नानें ठरवून टाकिलें आहे. हीं जीं अगदी मुळचीं रूपें, त्यांना 'प्रकृति' अशी संज्ञा केली आहे. वृक्षाला असंख्य शाखा पानें फुलें फळें असलीं, तरी त्यांचें मुळबीज एक. एका बीजाचा विस्तार अनंत असतो. तोच प्रकार भाषेमध्यें आहे. मूळच्या प्रकृतींची संख्या फार थोडी, पण त्यांचा विस्तार फार होऊन



अनुक्रमणिका

शब्दसंख्या वाढली आहे. प्रकृति निवडून काढून त्यांचे दोन वर्ग केले. **धातु** आणि **प्रातिपदिकें**. कांहीं तरी क्रियार्थ दाखविणारी जी प्रकृति तो **धातु**, आणि क्रियेहून कोणताही भिन्न अर्थ दाखविणारी जी प्रकृति तें **प्रातिपदिक**. तथापि मुळचीं प्रातिपदिकें फारच थोडीं. त्यांपेक्षां धातूंची संख्या मोठी. कित्येकांचें मत तर असें आहे कीं मुळीं प्रकृति ह्मटल्या ह्मणजे सर्वच धातुरूप. कित्येक प्रातिपदिकांमध्यें त्यांचा शोध लागत नाहीं, इतकाच विशेष. तें असो. प्रकृतीपासून सर्व शब्दसृष्टीचा आरंभ. प्रकृतीचा विस्तार ह्मटला ह्मणजे मुख्यत्वें प्रत्यय लागून होतो, आणि शब्दांना शब्द मिळून संयुक्त ह्मणजे सामासिक शब्दही होतात. प्रत्यय लागून जो विस्तार होतो त्यांत दोन प्रकार आहेत; ह्मणजे प्रत्ययांमध्येंच दोन जाति आहेत असें ह्मणण्यास बाध नाहीं. एका जातीचे प्रत्यय असे आहेत, कीं ते प्रकृतीला लागून एंकदा कांहीं रूप सिद्ध झालें, ह्मणजे मग त्या शब्दाची वाढ खुंटली. पुढें तो वाढत नाहीं. पण दुसऱ्या जातीचे जे प्रत्यय आहेत त्यांचें तसें नाहीं. त्यांच्या योगानें नवीन ह्मणजे प्रत्ययान्त प्रातिपदिकें किंवा प्रत्ययान्त धातु उत्पन्न होतात, आणि त्यांच्यापुढें पुनः प्रत्यय लागूं शकतात. पहिल्या जातीचे ह्मणजे शब्दाची वाढ खुंटविणारे जे प्रत्यय आहेत, त्यांना 'विभक्ति*प्रत्यय' अशी संज्ञा आहे. विभक्तिप्रत्यय लागून जे शब्द सिद्ध होतात, त्यांना 'पद' ही संज्ञा केली आहे. ही पदसंज्ञा नीट ध्यानांत ठेवावी; कांकीं व्याकरणाचे जे मुख्य विभाग करायाचे, ते या पदसंज्ञेवर फार अवलंबून आहेत. इतर ह्मणजे दुसऱ्या जातीचे प्रत्यय, यांमध्यें, 'तद्धितप्रत्यय,' 'कृत्प्रत्यय' इत्यादि कांहीं प्रकार आहेत. हे तद्धितादि प्रत्यय लागून जीं नवीन प्रातिपदिकें किंवा जे नवीन धातु सिद्ध होतील, यांच्यापुढें पुनः पूर्वोक्त विभक्तिप्रत्यय लागून, त्यांना पदसंज्ञा प्राप्त झालीच पाहिजे. पदसंज्ञा प्राप्त झाल्यावांचून कोणताही †शब्द किंवा धातु भाषेमध्यें योजण्याला योग्य होतच नाहीं.

'पद' ह्मणजे विभक्तिप्रत्ययांत शब्द, हें तर वर सांगितलेंच आहे. शब्द ह्मणजे कोणताही सार्थशब्द असें जरी खरें, तरी व्यवस्थे साठीं 'शब्द' ही संज्ञा विभक्तिप्रत्यय लावण्याच्या पूर्वींचें जें त्यांचें स्वरूप त्यालाच लावितात, पदाला लावीत नाहींत. या प्रमाणें 'शब्द' आणि 'पद' या संज्ञांचा भेद स्पष्ट केल्यानंतर, व्याकरणाचे असे विभाग होतातः— पदसिद्धि, शब्दसिद्धि, आणि पदयोजना. पदसिद्धि आणि शब्दसिद्धि या दोहों प्रकरणांना मिळून एक नांव द्यावयाचें असल्यास 'शब्दप्रकरण' किंवा 'शब्दखंड' हें नांव देण्याला बाध नाहीं. पण 'शब्दविचार' हें नांव प्रशस्त नाहीं असें आह्मांला वाटतें. कारण कीं यांत शब्दांचा नुसता विचार आहे असें नाहीं, शब्दांची सिद्धि आणि पदांची सिद्धि हे दोन विषय यांत मुख्य आहेत. 'वाक्यरचना' या नांवापेक्षां 'पदयोजना' हें नांव विशेष प्रशस्त

*धातूंपुढें लागणारे जे विभक्तिप्रत्यय, त्यांना 'आख्यातप्रत्यय' अशी वेगळी संज्ञाही आहे; परंतु ती सध्यां येथें सांगण्याचें कांहीं कारण नाहीं.

†वस्तुतः 'शब्द' संज्ञेमध्यें धातूंचेंही ग्रहण होत नाहीं असें नाहीं, तथापि धातुवर्ज्य जे इतर शब्द अर्थात् प्रातिपदिकें, त्यांनाच 'शब्द' ह्मणण्याचा विशेष संप्रदाय पडला आहे. धातूला बहुशः 'शब्द' ही संज्ञा लावीत नाहींत.





आहे असेंही आह्मांस वाटतें. असो. याप्रमाणें व्याकरणाचे ' शब्दप्रकरण ' आणि ' पदयोजना' हे दोन मुख्य भाग. शब्दप्रकरणाच्या पोटीं 'पदसिद्धि' आणि 'शब्दसिद्धि' हे दोन विभाग. ' वर्णविचार ' हा विषय यांतच घेतला किंवा वेगळा ठेविला तरी चालेल, असें पूर्वी ह्मटलेंच आहे. पदसिद्धीसाठीं शब्दांचें 'प्रातिपदिक' आणि 'धातु' असे दोन भेद. अव्ययें सुद्धां प्रातिपदिकांतच येतात. असें असतां आलीकडचे मराठी व्याकरणकार त्यांचा एक वेगळाच वर्ग कां करितात हें समजत नाहीं. हॉवर्ड साहेबानें आपल्या इंग्रजी व्याकरणांमध्यें नामें, धातु आणि अव्ययें असे तीन विभाग केले आहेत, ह्मणून कदाचित् हेही त्याला अनुसरून अव्ययांचा वर्ग वेगळा करीत असतील तर नकळे. शब्दसिद्धीच्या पोटीं तद्धितप्रकरण, कृदन्तप्रकरण, समासप्रकरण, साधितधातुप्रकरण, हीं येतात. यांशिवाय आणखी ' अपभ्रंशप्रकरण ' हा एक नवीन विषय मराठी व्याकरणाच्या या शब्दसिद्धिप्रकरणांत प्रविष्ट झाला पाहिजे, त्याशिवाय व्याकरणाला पूर्णता येणार नाहीं, असें आमचें मत आहे.

व्याकरणाची अशी व्यवस्था लावणें हें किती वरें सरळ आणि स्वाभाविक आहे? या व्यवस्थेनें, ' रचनेवरून ' शब्दांचे भेद, आणि ' उपयोगावरून ' शब्दांचे भेद (ले. ४२ पहा), असें जोशीबुवांचें अशास्त्र आणि विलक्षण वर्गीकरण सहज दूर होईल. इतकेंच नव्हे, पण पुढें विभक्तिप्रकरणीं अनेक वादग्रस्त विषयांचा निर्णय ठरविण्यास इजपासून मोठें साहाय्य होणार आहे. यास्तव मराठी वैयाकरणांनीं विशेषें करून या गोष्टीकडे लक्ष देणें अवश्य.

असो. पुढें चालूं. जोशीबुवांनीं (ले.४२) प्रातिपदिकें, क्रियापदें आणि अव्ययें, असे मूळ शब्दांचे तीन वर्ग केले आहेत, त्यांमध्यें ' क्रियापदें ' अशी जी एका वर्गाला त्यांनीं संज्ञा केली आहे, ती सर्वथा अप्रशस्त असें ह्मणणें प्राप्त आहे. धातुरूपशब्दाला ' क्रियापद ' ही संज्ञा यांनींच नवी लाविली आहे असें नाहीं. आजपर्यंत झालेल्या बहुतेक व्याकरणांमध्यें हाच प्रकार. परंतु ' पद ' संज्ञेचा जो अर्थ वर सांगितला आहे, त्यावरून स्पष्टपणें लक्षांत येण्यासारखें आहे, कीं धातूला आख्यातप्रत्यय लागून जें रूप सिद्ध होतें तेंच क्रियापद; मूळच्या धातूला ' क्रियापद ' हा शब्द लागत नाहीं. तेथें 'धातु' किंवा 'धातुशब्द' हीच संज्ञा योग्य आहे. असें असतां ही एवढी मोठी ढोबळ चूक कशी झाली असावी, याचा विचार करितां असें लक्षांत येतें कीं, इंग्रजीमध्यें 'verb व्हर्ब्' अशी जी संज्ञा, तिच्या स्थानीं ' क्रियापद' शब्द सरसकट योजल्यामुळें हा गोंधळ उत्पन्न झाला आहे. इंग्रजी व्याकरणामध्यें मूळशब्द आणि पद (ह्मणजे विभक्त्यंतशब्द) यांना वेगवेगळ्या संज्ञा नाहींत. यामुळें त्यांच्या तन्हेवर जाऊन ' शब्द ' आणि ' पद ' यांचा जो मराठी वैयाकरणांनीं गोंधळ केला आहे, त्याचाच हा परिणाम होय. मूळचा धातुशब्द, आणि आख्यात प्रत्ययांत शब्द ह्मणजे क्रियापद या दोहोंलाही इंग्लिश व्याकरणकार ' व्हर्ब् ' ही संज्ञा लावितात, असें पाहून मराठी वैयाकरणांनीं खऱ्या क्रियापदांना आणि त्यांच्या संगतीं धातुशब्दांनाही ' क्रियापद' ही संज्ञा धडकावून दिली आहे! इतकेंच नव्हे, दुसरा एक चमत्कार झाला आहे. इंग्रजींतील ' व्हर्ब् ' या संज्ञेचा मूळ अर्थ केवळ शब्द, ह्मणजे कोणताही शब्द, असा होता. यामुळें इंग्रजी व्याकरणकारांचा एक लेख आहे कीं, " ' व्हर्ब् '



अनुक्रमणिका

या शब्दाचा अर्थ धातूचें कोणतेंही रूप असा होतो, तरी व्याकरणांत धातूचे कालदर्शक रूपासच व्हर्ब् ह्मणतात; बाकीच्यांस कृदन्तें किंवा धातुसाधितें ह्मणतात. " आतां 'व्हर्ब्' ह्मणजे मराठी वैयाकरणांचें 'क्रियापद.' तेव्हां जोशीबोवांनीं तोच लेख आपल्या मराठी व्याकरणांत बिनधोक घुसडून दिला! ते ह्मणतात, (ले. ७४३.) 'क्रियापद शब्दाचा अर्थ कोणचेंही धातूचें रूप असा आहे, तरी व्याकरणांत धातूचे कालदर्शक रूपासच क्रियापदें असें ह्मणतात; बाकीच्यांस कृदंतें किंवा धातुसाधितें असें ह्मणतात.' परंतु क्रियापद शब्दाचा अर्थ धातूचें कोणतेंही रूप असा मराठींत किंवा संस्कृतांत कधींही होत नाहीं. कृदन्तादिकांना क्रियापद हा शब्द अगदीं लागत नाहीं. कारण कीं, कृदंतादिकांना पदसंज्ञा मुळींच नाहीं, तेव्हां क्रियापदांमध्यें त्यांचा समावेश कसा होईल?

असो. प्रातिपदिकें आणि धातु यांचीं लक्षणें वर दिलींच आहेत. तथापि प्रकृतिरूप जीं प्रातिपदिकें आणि धातु त्यांचा मात्र त्या लक्षणांत समावेश होतो. ह्मणून एथें सांगणें अवश्य आहे कीं प्रकृतिरूप शब्दाला कित्येक प्रत्यय लागून नवीन प्रातिपदिकें आणि धातु उत्पन्न होत असतात त्यांचेंही त्यांत ग्रहण केलें पाहिजे. हें उघड आहे कीं हे जे प्रत्यय एथें निर्दिष्ट केले ते विभक्तिप्रत्ययांहून भिन्न होत; ह्मणजे प्रत्ययांच्या ज्या दोन जाति वर सांगितल्या आहेत त्यांतील दुसऱ्या जातीचे हे होत. ह्मणून हे प्रत्यय लागून सिद्ध झालेल्या नवीन शब्दांपुढें विभक्तिप्रत्यय लागण्याला कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध नाहीं.

## प्रातिपदिकांचे विभाग.

प्रातिपदिकांचे विभाग जोशीबुवांनीं नामें, विशेषणें, आणि सर्वनामें असे तीन केले आहेत. आमच्या मतें अव्ययेंही प्रातिपदिकांतच आलीं पाहिजेत; आणि सर्वनामांचा स्वतंत्र वर्ग न होतां, त्यांचा समावेश नामांच्याच पोटीं झाला पाहिजे. अव्ययांना जरी सर्व विभक्ति लागत नाहींत, तरी केव्हां केव्हां कांहीं विभक्ति लागतात. त्यांना प्रातिपादिकांच्या बाहेर टाकण्यास कोणतेंही योग्य कारण दिसत नाहीं. आतां, सर्वनामांविषयीं ह्मटलें तर तीं एका प्रकारचीं नामेंच आहेत. ह्मणून नामांचे सामान्य विशेष इत्यादि जसे भेद, तसाच हाही एक भेद आहे. वाक्यामध्यें नामाला जो जो अधिकार असतो, ह्मणजे वाक्यरचनेच्या संबंधानें नामाची जशी योजना होते, तशीच सर्वनामाची ही होते. इतर नामांपेक्षां सर्वनामांमध्यें अर्थदृष्ट्या कांहीं एका प्रकारची थोडीशी भिन्नता आहे इतकेंच. त्यांचा वेगळा पोटभेद मानण्याचें मुख्य कारण हेंच कीं त्यांचीं विभक्तिरूपें सर्वथा सामान्य नियमाला अनुसरून होत नाहींत, हें होय. इंग्लिश व्याकरणकार सर्वनामांचा वर्ग वेगळा करितात ह्मणून मराठींतही तो आह्मी वेगळा करावा असें नाहीं. तात्पर्य, प्रातिपदिकांचे विभाग नामें, विशेषणें आणि अव्ययें, असे करावे, असें आमचें मत आहे. नामादिकांचीं लक्षणें कशी काय करायाचीं तीं पाहूं.

**बाळशास्त्री**—इतर शब्दांशीं संबंध नसतां ज्याशब्दापासून वस्तूचा बोध होतो त्या शब्दास **नाम** असें ह्मणावें.

**दादोबा—नाम** ह्मणजे पदार्थमात्राचें नांव, मग ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं असो.

**गोडबोले**—पदार्थांच्या नांवांस **पदार्थवाचक नामें** किंवा फक्त **नामेंच** ह्मणतात.

**जोशी**—१ ज्या प्रातिपदिकांवरून स्वतंत्र रीतीनें पदार्थाचा बोध होतो, व ज्यांचा अर्थ विशेष्य असतो, त्यांस नामें ह्मणतात.





२ ज्या शब्दापासून संख्या लिंग ( स्त्रीपुरुषभेद ) इत्यादिकांनीं युक्त अशा पदार्थांचा बोध होतो, व ज्यांस विभक्त्यादि कार्यें होऊन क्रियापदाशीं त्यांचा संबंध असतो, त्यांस **नामें** असें ह्मणतात.

**विशेषणाचें लक्षण—बाळशास्त्री**—पदार्थाचा गुण किंवा दोष दाखविणारा जो शब्द त्यास विशेषण असें ह्मणावें.

**दादोबा**—विशेषण ह्मणजे नामाच्या गुणाचा दर्शक जो शब्द तो.

**गोडबोले**—विशेषणानें गुण किंवा संख्या समजते.

**जोशो**—त्यांचा ( ह्म० प्रातिपदिकांचा ) अर्थ गौण असून त्यांचा दुसऱ्या प्रातिपदिकांशीं संबंध असला, ह्मणजे त्यांस विशेषणें ह्मणतात.

संस्कृत व्याकरणामध्यें कोणत्याही प्रातिपदिकाला, अर्थात् विशेषणाला सुद्धां 'नाम' ही संज्ञा लावतां येते. त्याप्रमाणेंच वस्तुबोधक शब्दालाही विशेषण संज्ञा होऊं शकते. जसें 'नर्मदा नदी,' एथें 'नर्मदा' हें नदीशब्दाचें विशेषण आहे. तथापि मराठी व्याकरणामध्यें इंग्रजी व्याकरणाच्या धोरणानें नाम आणि विशेषण यांच्या अर्थाची व्याप्ति संकुचित झाली आहे हें एका अर्थीं बरेंच झालें आहे. तथापि त्यांचीं निर्दोष लक्षणें सांगणें हें अमळ कठीणच काम खरें. कारण त्यांच्या लक्षणांमध्यें येणारे पदार्थ, वस्तु, गुण, दोष, संख्या, इत्यादि जे शब्द आहेत, त्यांच्याच अर्थाची मोठी भानगड आहे. पदार्थ ह्मणजे स्पर्शेंद्रियानें जाणतां येणारें, हात लावून पाहतां येणारें, किंवा निदानपक्षीं नेत्रांना दिसणारें, असें कांहींतरी. अशी साधारणतः सर्वांची समजूत असते. तेव्हां अशा पदार्थांच्या नांवालाच जर नाम ह्मणावें, तर या लक्षणामध्यें संपूर्ण नामांचा संग्रह कदापि होणार नाहीं. दादोबांनीं ह्मटलें आहे कीं ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं असो; परंतु एवढ्यानें पुरती समजूत होणें कठीण आहे. संशय, आकाश, पोकळी, अभाव, हीं निःसंशय नामें आहेत तथापि तीं पदार्थांचीं नांवें कशीं ? किंवा त्यांच्या पदार्थाचा नुसता संस्कार तरी मनाच्या ठायीं कसा व्हावा? हें स्पष्ट होत नाहीं. परंतु संस्कृत नैयायिकांनीं याचा उलगडा उत्तम प्रकारें केला आहे, आणि तोच प्रस्तुत प्रसंगीं गृहीत करणें हें अवश्य आणि फार सोयीचें आहे. '**अभिधेयत्वं पदार्थत्वम्।**' हें कांहीं तरी अमुक, किंवा याला कांहीं ना कांहीं तरी नांव देतां येईल, इतकें मनांत येण्यासारिखें असलें ह्मणजे पुरे. ज्याला कांहीं ना कांहीं नांव देतां येईल तो पदार्थ, आणि अशा पदार्थाचें जें नांव तें नाम. सारांश, **नाम ह्मणजे कशाचेंही नांव**. या लक्षणाहून दुसरें चागलें लक्षण मिळणार नाहीं, अशी आमची तर समजूत आहे. द्रव्य, गुण, क्रिया, जाति, भेद, संबंध, आणि शेवटीं अभाव सुद्धां या लक्षणामध्यें येतो, आणि यांनाच 'सप्त पदार्थ' ही संज्ञा आहे.

उदाहरणार्थ—

द्रव्य—मृत्तिका, वायु. इ०.

गुण—तांबडेपणा, एक, दान इ०.

क्रिया—उठणें, चालणें, पलायन इ०.

जाति—मनुष्यत्व, पशुत्व, इ०.

भेद—अंतर.

संबंध—पितापुत्रांचें नातें, इ०.

अभाव—अंधकार, अन्याय, इ०.

हीं सर्व उदाहरणें नामांचीं आहेत. तेव्हां नाम ह्मणजे द्रव्याचें नांव घ्या, गुणाचें नांव घ्या, क्रियेचें नांव घ्या, जातीचें नांव घ्या, भेदाचें नां-




अनुक्रमणिका

व ध्या, संबंधाचें नांव ध्या, अभावाचें नांव ध्या, कशाचेंही नांव ध्या, तें वरील लक्षणांत येतें, त्याच्या बाहेर जाऊं शकत नाहीं. काल, दिक्, मन, आत्मा हे सुद्धां पदार्थ आहेत. हे द्रव्य वर्गांत धरिले आहेत; ते कां, याचा एथें विचार करण्याचें कारण नाहीं. कां कीं ते कोणत्याही वर्गांत धरिले तरी त्यांचें पदार्थत्व जात नाहीं, इतकें आपणास पुरे आहे.

'वस्तु' शब्दाविषयीं पाहिलें तरी अडचण येतेच. जें कांहीं सत्यत्वें करून आहे तें वस्तु. ह्मणून हा शब्द नामशब्दाच्या लक्षणामध्यें निर्दोषपणें योजतां येवत नाहीं. गोडबोले आणि जोशी यांनीं दिलेलीं लक्षणें तर कांहींच कामाचीं नाहींत. त्यांत आधीं अर्थ स्पष्ट नाहीं. आणि जोशीबुवांच्या लक्षणामध्यें अन्योन्याश्रय आणि लिंग संख्या कारक विशेष्य इत्यादिकांच्या ज्ञानाची अपेक्षा, हे दोष स्पष्ट दिसतच आहेत. तस्मात् त्यांविषयीं आणखी अधिक कोटिक्रम करण्याचें कारण नाहीं.

आतां विशेषण ह्मणजे काय? —वर जीं आमच्या मराठी वैयाकरणांनीं दिलेलीं विशेषणांचीं लक्षणें उतरून घेतलीं आहेत, त्यांनीं निर्वाह होत नाहीं, असें ह्मणणें प्राप्त होतें. गुण काय? आणि दोष काय? तसेंच गुण काय? आणि संख्या काय? तसाच नामाचा गुण दाखवावयाचा ह्मणजे कसा, हें कांहीं स्पष्ट नाहीं. नामाचें लक्षण जसें त्यांनीं इंग्रजी व्याकरणांतून घेतलें आहे, तसेंच विशेषणाचेंही इंग्रजी व्याकरणांतूनच घेतलें आहे. परंतु An adjective is a word that qualifies a noun, यामध्यें जो अर्थ आहे तो त्यांनीं दिलेल्या मराठी लक्षणांत येत नाहीं. नामाच्या अर्थाला कांहीं विशेष अर्थ लावणारा जो शब्द तें विशेषण, असें इंग्रजींतील लक्षण आहे.' qualify क्वालिफाइ, ह्मणजे अमुक वस्तु 'अशी अशी आहे असें ह्मणणें' 'अर्थात् विशेष सांगणें. ह्मणून या अर्थाला जमवून जर हें लक्षण दिलें असतें, तर फार चांगलें होतें.

जोशीबुवांनीं आणखी ह्मटलें आहे— (ले. १६२) "जीं प्रातिपदिकें दुसऱ्या प्रातिपदिकांच्या अर्थाला मर्यादित करितात, त्यांस विशेषणें ह्मणतात." परंतु इतक्यानेंच सर्व अर्थ स्पष्ट होत नाहीं, आणि पुनः भ्रांति मात्र उत्पन्न होते. विशेषणाच्या योगानें प्रातिपदिकाचा अर्थ मर्यादित होतो असें नाहीं; तर प्रातिपदिकाचा अर्थ वाढतो. पण त्या अर्थाची व्याप्ति मात्र मर्यादित होते. उदाहरणार्थ, 'घोडा' या शब्दापासून चतुष्पाद जातीचा कांहीं विशेष प्राणी असा अर्थ होतो. त्याला 'काळा' हें विशेषण लागतांच काय झालें? तर 'घोडा' हा जो अर्थ, त्या अर्थाला 'काळेपणा' हा आणखी अर्थ अधिक लागला. परतु त्याच कारणानें दुसरा परिणाम असा झाला, कीं त्या 'घोडा' या अर्थाची व्याप्ति मर्यादित झाली. ती अशी—' घोडा' या शब्दानें पूर्वीं, जितके ह्मणून घोडे, तितक्या सर्व घोड्यांचा बोध होत असे, पण 'काळा' हें विशेषण लागतांच जितके काळे घोडे तितक्यांचा मात्र बोध राहिला. तांबडे, पांढरे, इत्यादि भिन्न रंगाचे जे घोडे तें मर्यादेच्या बाहेर पडले. तेव्हां विशेषणापासून नामाच्या अर्थाची मर्यादा होते असें नव्हे. अर्थ तर वाढतो, पण त्याची व्याप्ति मात्र मर्यादित होते. संस्कृतामध्येंही '**भेदकं विशेषणम्**' असें लक्षण आहे. भेदक ह्मणजे अन्यपदार्थाची व्यावृत्ति, करणारें परंतु ही व्याख्या ही समजायाला अमळ कठीणच- ह्मणून भेद ह्मणजे विशेष यावरून नामाच्या अर्थाला विशेष अर्थ जोडणारा शब्द तें विशेषण. ना-





अनुक्रमणिका

माचा अर्थ वाढविणारा जो शब्द तें विशेषण असें कांहींतरी लक्षण केलें तर पुरे आहे

आतां अव्यय शब्दाचें लक्षण –ज्या शब्दाला लिंग वचन विभक्ति यां पासून कांहीं विकार होत नाहीं त्या शब्दाला अव्यय ह्मणावें हें ठीक आहे. परंतु लिंग,वचन, यांचीं लक्षणें स्पष्ट होत तों पर्यंत, "ज्या प्रातिपदिकांना प्रत्ययादि विकार न होताही पदत्व प्राप्त होतें, तीं अव्ययें," असें लक्षण करण्यास कांहीं बाध नाहीं. संस्कृत व्याकरणामध्यें, अव्ययांना विभक्त्यादि कार्यें होत नाहींत, असें ह्मणत नाहींत. तर, अव्ययांना विभक्तिप्रत्यय जरी लागतात, तरी त्या प्रत्ययांचा लोप होतो, आणि त्या प्रत्ययांच्या निमित्तानें प्रातिपदिकाला कांहीं विकार होत नाहीं, असें ह्मणतात. असो, तात्पर्यांश फारसा भिन्न नाहीं.

धातुशब्दाचें लक्षण वर आलेंच आहे. तथापि त्याविषयीं थोडासा विस्तार करणें अवश्य दिसतें. 'जाणें' आणि 'जातो' या दोन्ही शब्दांपासून क्रियेचा बोध होतो खरा, तरी 'जाणें' हाही धातुशब्द नव्हे, आणि 'जातो' हाही धातुशब्द नव्हे. तर या दोहोंमध्यें दिसणारा जो 'जा' इतका अंश, तो धातुशब्द. कारण कीं 'जा' या अंशामध्यें 'जाणें, हा जो क्रियार्थ तो केवळ बीजरूपानें आहे, त्यामध्यें पदार्थत्व नाहीं; आणि जाणें यांमध्यें जरी क्रियार्थ आहे, तरी णें प्रत्ययाच्या योगानें त्याच्यामध्यें पदार्थत्व येत असल्यामुळें त्याला नामसंज्ञा होते. अर्थात् त्याला धातुसंज्ञा नाहीं. 'जातो' यामध्यें जरी क्रियार्थ आहे, तरी त्यांत 'तो' हा आख्यात प्रत्यय असल्यामुळें, 'जातो' याला पदत्व आलें आहे. ह्मणून त्यालाही धातुसंज्ञा लागत नाहीं.

मराटींत प्रत्येक धातुशब्दासारखेंच एक क्रियापद (आज्ञार्थीं) आढळतें, ह्मणून 'धातुशब्दही प्रचारांत आढळतो.' असें कदाचित् ह्मणतां येईल. परंतु संस्कृतामध्यें बहुतेक क्रियापदांचा धातुशब्द भाषेमध्यें आढळत नाहीं. अनेक क्रियापदांच्या तुलनेनें त्यांतून धात्वंश वेगळा काढलेला असतो. तथापि भाषेच्या अत्यंत मूळारंभीं धातुशब्दही कोणत्या तरी, रूपानें व्यवहारामध्यें येत असावा, असा तर्क करण्यास आधार दिसतो.

---

## विभक्तिप्रकरण.

विभक्तिप्रकरण नीट समजण्यासाटीं, आधीं नामादिकांचे पोटभेद आणि लिंगविचार हीं प्रकरणें सांगितलीं पाहिजेत.

नामाच्या जाति कोणीं 'सामान्य' आणि विशेष' अशा दोन केल्या आहेत ; कोणीं 'भाववाचक' हा एक अधिक भेद मानिला आहे; कोणीं अधिकही केल्या आहेत. पण या जाती कोणत्या पायावर रचिल्या आहेत हें सांगणें कठीण आहे. जोशीबुवांनीं ह्मटलें आहे कीं (ले. ५३) 'सामान्यनाम व विशेषनाम हे भेद नामाच्या अर्थावरून केले आहेत.' 'उपयोगावरून सामान्यनामाचे अनेक पोटभेद मानितां येतील, परंतु त्यांतले, १ गुणवाचक नामें, २ भाववाचक नामें, ३ द्रव्यवाचक नामें व ४ समुदायवाचक नामें हे मुख्य आहेत.' (ले. ५५)

आमचें मत असें आहे कीं कोणत्याही शास्त्रीय ग्रंथामध्यें एकाद्या विषयाचे जेव्हां विभाग करायाचे असतात, तेव्हां त्या विभागांचा उपयोग काय, हें लक्षांत आणिल्यावांचून कधींही ते विभाग करूं नयेत. कांहीं विभाग उपयोगावरून व कांहीं विभाग आणखी कांहीं आधारावरून करायाचे, ह्मणजे या कृत्यास काय ह्मणावें हें आह्मांस तर समजत नाहीं. ज्या



कृत्याचा उपयोग नाहीं, तें कृत्य करणें ह्मणजे केवळ जलताडन होय. तें पाहिजे कशाला? उपयोगास्तव जे भेद करायाचे त्यांचेंच काय ते प्रयोजन, असें आह्मी समजतों. परंतु आमच्या मराठी व्याकरणकर्त्यांच्या मनांत ही गोष्ट अद्यापि येत नाहीं असें दिसतें!

वास्तविकपणें ह्मटलें ह्मणजे, मराठी व्याकरणांत नामाच्या जाती सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. इंग्रजी व्याकरणामध्यें त्या दिलेल्या आहेत, ह्मणून मराठी व्याकरणांत त्या दिल्या पाहिजेत, हेंच जर कारण असलें तर त्या खुशाल द्याव्या. परंतु त्यांचा मराठी व्याकरणांत ह्मणण्यासारखा कांहीं उपयोग नाहीं. संस्कृतांत तर त्या मुळींच दिल्या नाहींत. इंग्रजी व्याकरणांत विशेषनामें सर्व समजलींच पाहिजेत. कारण कीं विशेषनामांचीं बहुवचनें करण्याचे कांहीं वेगळे नियम आहेत. पण हेंही मुख्य कारण नव्हे. संस्कृतामध्यें गार्ग्यादिकांच्या बहुवचनीं कांहीं विशेषप्रकार होत असतो, पण तेवढ्यावरून विशेषनामांचें वेगळें लक्षण सांगितलेलें नाहीं. पण विशेषनामाचें प्रथमाक्षर इंग्रजी भाषेच्या रीतीप्रमाणें मोठें लिहिले पाहिजे, म्हणून विशेषनामें समजण्याची इंग्रजीमध्यें आवश्यकता. तसें कांहीं मराठींत नाहीं. आकारांत विशेषनामांच्या विभक्तींमध्यें थोडेसें त्यांच्या ज्ञानाचें कदाचित् कारण पडेल, परंतु त्यावांचून कांहीं अडेलच असें नाहीं. असें असतां 'कर्ण' हें नांव सामान्यनाम मानावें किंवा विशेषनाम मानावें, याविषयीं रिकामा वाद करण्यामध्यें वेळ घालवून फळ काय? त्याला विशेषनामच सर्वदा ह्मटलें, किंवा 'तो आजकाल कर्ण आहे' अशा वाक्यामध्यें त्याला सामान्यनाम ह्मटलें, तर नफा तोटा काय? समुदायवाचकनामें, किंवा द्रव्यवाचक नामें यांचीही गोष्ट तीच आहे. समुदायवाचकनामें इंग्रजींत दिलीं आहेत, त्यांचें तेथें कारण आहे. केव्हां त्यांना लावायाचें क्रियापद एकवचनीं असतें, केव्हां अनेकवचनीं असतें. ह्मणून त्या विभागाचें कारण पडतें. पण मराठींत त्याचें काय प्रयोजन? तसेंच 'द्रव्यवाचकनामें' ह्मणून जी जोशीबोवांनीं इंग्रजींतील 'nouns of materials नाउन्झ् ऑव्ह् मटीरीयल्झ्' या अर्थाला मराठींत आणण्याकरितां संज्ञा केली आहे, तिचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. कारण त्या संज्ञेमध्यें पाणी, सोनें, यांचा जसा समावेश होतो, तसा वृक्ष, पाषाण, यांचाही अवश्य समावेश होतोच. तेव्हां तो विभागही कांहीं कामाचा नाहीं. गुणवाचकनामें, आणि भाववाचकनामें देण्यापेक्षां 'क्रियावाचकनामें' दिलीं असतीं तर त्यांचा कांहींतरी उपयोग झाला असता. कोणी ह्मणेल कीं 'भाववाचक' इत्यादि संज्ञा पुढें तद्धितादिप्रकरणांत येत नाहींत कीं काय? हो, येतात खऱ्या. पण दुसऱ्याही शतशः संज्ञा येतात, त्यांचाही कां येथें संग्रह करूं नये? पाटीलकी मामलेदारी इत्यादि अधिकारवाचक नामें; शेती, सुतारकी इत्यादि उद्यमवाचक नामें; वसंत, ग्रीष्म, इत्यादि ऋतुवाचक नामें; गंगा यमुना इत्यादि नदीवाचक नामें; अशीं शतशः प्रकारचीं नामें मानतां येतील. परंतु त्यांचीं मुद्दाम लक्षणें सांगत बसण्यापासून कांहीं उपयोग नाहीं. आतां वडिलोपार्जित वहिवाट चालत आलेली मोडणें हें पातक वाटत असल्यास अथवा व्यवहार ज्ञानाच्या वृद्धीला उपयोगी पडतील ह्मणून सामान्य, विशेष, आणि फार तर भाववाचक, आणि सर्वनाम असे विभाग दिले तर पुरेत असें आह्मांस वाटतें. परंतु त्यांतही कर्णाची विशेष पदवी





अनुक्रमणिका

काढून घेऊन त्याला सामान्यांत ढकलणें, हें ग्राह्य किंवा अयोग्य, हा व्याकरणाचा विषय नव्हे, असें ह्मणणें आह्मांस अवश्य वाटतें.

सामान्यादिकांचीं लक्षणें देण्यामध्यें कित्येकांनीं उगीच ओढाताण केली आहे, तीही प्रशस्त नाहीं, असें ह्मणावें लागतें.

**दादोबा**- सामान्यनाम ह्मणजे जातिबोधक संज्ञा, ज्यांत या नामजातीचा धर्म अनेकांवर राहतो.

विशेषनाम ह्मणजे व्यक्तिबोधक संज्ञा, ज्यांत या नामाचा धर्म एकावरच राहतो.

ज्या नामांवरून कोणत्याही व्यक्तीचा शुद्धभाव अथवा धर्म यांचा उद्बोध होतो, तीं सारीं भाववाचक नामें.

**गोडबोले**-जें नाम एका वर्गांतील पदार्थांतून कोणत्याही एकास एकच अर्थानें लावतां येतें तें सामान्यनाम होय.

व्यक्तींचीं जी नांवें तीं विशेषनामें.

पदार्थांपासून वेगळा मानिलेला जो त्यांचा साधारण गुण भाव किंवा स्वरूप त्याचें जें नांव तें भाववाचक किंवा धर्मवाचकनाम होय.

**जोशी** —ज्यां नामांवरून जातीचा किंवा गुणाचा बोध होऊन त्या जातीचा किंवा तद्गुणविशिष्ट पदार्थांचा बोध होतो, त्यास सामान्यनामें असें ह्मणतात.

पदार्थमात्रांची (?) किंवा व्यक्तिमात्रांची (?) स्वतःची नामें, ज्यांच्यावरून जाती किंवा गुण यांचा बोध न होतां केवळ त्या त्या व्यक्तीचा मात्र बोध होतो, त्यांस विशेषनामें असें ह्मणतात.

पदार्थांचा भाव किंवा धर्म यांचीं दर्शक जीं नामें तीं भाववाचक नामें.

यांत एकीपेक्षां एक व्याख्या मोठी; परंतु अर्थाकडे लक्ष देऊन पाहिलें असतां एकीपेक्षां एक बिकट. या सर्वांपेक्षां बाळशास्त्र्यांनीं आपल्या बालव्याकरणांत दिलेल्या व्याख्या फार बऱ्या असें ह्मणणें प्राप्त होतें.

**बाळशास्त्री**.—जातिमात्राचें जें नाम तें सामान्यनाम. जसें मनुष्य, पक्षी. इ०.

"कोणे एकेच वस्तूचें जें नाम तें विशेषनाम. जसें, परमेश्वर, गोविंदा, करवीर, इ०.

त्यांनीं भाववाचकनामांचें लक्षण दिलेलें नाहीं. तथापि बालव्याकरणांतल्या या लहानशा दोन वाक्यांमध्यें जो अर्थ आहे, त्यापेक्षां मोठमोठ्या वैयाकरणांच्या लांबलचक वाक्यांमध्यें अधिक अर्थ तर कांहीं नाहीं; पण शब्दांचा गोंधळ मात्र विशेष आहे, असें स्पष्ट लक्षांत येईल. सामान्य, जाति, व्यक्ति, धर्म, वाचक, बोधक, विशिष्ट, हे शब्द पुनःपुनः उलटे सुलटे हवेत तितके योजले तरी, अर्थ जर स्पष्ट नाहीं, तर त्यांचा उपयोग काय? सामान्याचें किंवा जातीचें नांव तें सामान्यनाम, व्यक्तीचें नांव तें विशेषनाम, आणि भाव दाखविणारें नांव तें भाववाचकनाम, हेंच पुनःपुनः उलटें सुलटें सांगितल्यानें अधिक अर्थनिष्पत्ति काय वरें होणार?

एकजातीय अनेक पदार्थांच्या समुदायांतील प्रत्येक पदार्थाला जें नांव लावतां येतें तें सामान्यनाम. जसें मनुष्य, पक्षी इ०.

एकाच पदार्थाचें जें नांव तें विशेषनाम जसें, हरि, नारायण, इ०.

अनेक पदार्थांमध्यें असणाऱ्या कांहीं सारखेपणाचें जें नांव तें भाववाचकनाम. जसें, मनुष्यत्व, सौजन्य, इ०.

सामान्य, विशेष, भाव, इत्यादि संज्ञा न्यायशास्त्रसंबंधीं आहेत. ह्मणून जर त्या स्पष्ट करायाच्याच, तर थोडासा विस्तार केला पाहिजे.



'सुवर्ण' आणि 'सुवर्णत्व' हे दोन भिन्न भिन्न पदार्थ. त्यांत 'सुवर्ण' या पदार्थाचें केवळ मनानें गृहीत करायाजोगें जें सर्वस्व तें 'सुवर्णत्व.' त्यालाच भाव ह्मणतात. आणि त्याचेंच नांव, ह्मणजे 'सुवर्णत्व' हा जो केवळ शब्द, याला भाववाचकनाम ह्मणतात. अनेक पदार्थांमध्यें जो असा समान भाव, त्याचें नांव जाति किंवा सामान्य. ह्मणून अनेक मनुष्यांमध्यें जो समान भाव, ह्मणजे मनुष्यत्व, ती जाति. 'मनुष्य' हा शब्द उच्चारितांच, ज्या ज्या पदार्थांमध्यें मनुष्यत्व ही जाति आहे, ते ते सर्व पदार्थ लक्षांत येतात. ह्मणून 'मनुष्य' या शब्दाला सामान्यनाम ह्मणावें. विशेष ह्मणजे भेद. जेव्हां एकादा शब्द उच्चारिला असतां इतर सर्व पदार्थ दूर होऊन, त्यापासून कांहीं तरी एकाच पदार्थाचा बोध होतो, तेव्हां त्या शब्दाला विशेषनाम ह्मणतात.' हरि ' हा शब्द उच्चारितांच, इतर सर्व पदार्थांची व्यावृत्ति होऊन 'हरि' ह्मणून जो एकच पदार्थ (मनुष्य) याचें ग्रहण होतें.

---

## आपल्या भाषेचें पुढें काय होणार?

कित्येक गोष्टी अशा आहेत कीं त्यांविषयीं जितका विचार करावा तितका थोडाच. अशां पैकींच कांहीं गोष्टींकडे आज आपण लक्ष देऊं. पुष्कळ लोकांच्या मनामध्यें वारंवार असे प्रश्न येत असतील कीं, काय हो, आमच्या या देशाचें पुढें व्हायाचें काय? आमच्या लोकांचें व्हायाचें काय? आमच्या धर्माचें व्हायाचें काय? आमच्या भाषांचें व्हायाचें काय? आमच्या रीतीभातींचें, आमच्या धंद्यारोजगारांचें, आमच्या कलाकौशल्याचें, आमच्या बायकामुलांचें, आणि दुसऱ्या अनेक गोष्टींचें पुढें व्हायाचें काय? प्रश्न दिसतात लहान, पण यांचीं उत्तरें फार कठीण आहेत. तरी हे प्रश्न फार महत्वाचे होत. यांचा विचार प्रत्येक मनुष्यानें करण्याला योग्य आहे, तथापि सर्वच विषय एकदम घेऊन त्यांचा निकाल लावण्याचा प्रयत्न करणें सर्वथा अशक्य. म्हणून सोई सोई प्रमाणें एक एक विषय घेऊं. त्या त्या विषयांच्या महत्त्वाप्रमाणें त्यांचा अनुक्रम लावतां येईल. आणि त्या अनुक्रमाला लक्षून प्रत्येक विषयाची चर्चा झाली तर तितकी विशेष चांगली गोष्ट होईल हें खरें आहे. तथापि तसा क्रम साधणें फारच कठीण, ह्मणून जसजशी अनुकूलता होईल, तसतसा एकएक विषय ह्मणजे पूर्वोक्त प्रश्नांपैकीं एकेक प्रश्न घेऊन त्याची चर्चा करण्याचा प्रयत्न करूं. आजरोजीं जो प्रश्न घ्यावयाचा तो हा,—"आमच्या भाषांचें पुढें व्हायाचें काय?"

या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वीं, आधीं त्यामध्यें काय काय गोष्टींचा समावेश होतो. हें पाहिलें पाहिजे. आमच्या मतें या प्रश्नामध्यें इतक्या गोष्टी येतात. १ आमच्या भाषा ह्मणजे काय? २ त्यांची सध्यांची स्थिति कशी आहे? ३ त्यां कडे आह्मी दुर्लक्ष केल्यानें काय परिणाम होण्याचा संभव आहे? आणि ४ त्यांच्या संबंधानें आपलें प्रत्येकाचें कर्तव्य काय आहे? इतक्या गोष्टींचा विचार झाला, ह्मणजे मुख्य प्रश्नाचें उत्तर सहज निघण्या जोगें होईल.

१. वस्तुतः आमच्या भाषा ह्मणजे भरतखंडांतील सर्व भाषा असा अर्थ निष्पन्न होतो. तथापि तितका विस्तृत अर्थ आज





अनुक्रमणिका

आह्मी घेत नाहीं. तर इतकाच घेतों कीं आमची महाराष्ट्र देशाची जी शुद्ध मराठी भाषा ती, आणि 'मराठी भाषेच्या पोटभाषा' हें नांव ज्या भाषांना लावितां येईल, अशा कोंकणी, गोमंतकी, खानदेशी, वऱ्हाडी, इत्यादि ज्या शुद्धाशुद्ध भाषा, त्या आमच्या भाषा असा ऐथें अर्थ घेतला आहे. इतक्यांच्या संबंधानेंच जर यथातथ विचार झाला, तर तोच कांहीं थोडयाशा फेरफारानें महाराष्ट्राच्या बाहेरच्या भाषांनाही लावितां येईल. अथवा ज्यांना तो विषय फार निकट संबंधाचा असेल, ते लोक त्याकडे लक्ष देतील.

२. आमच्या भाषांची सांप्रतची स्थिति कशी काय आहे? आपली जी खुद्द ह्मणजे शुद्ध मराठी भाषा, तिची स्थिति पाहिली, तर सांप्रत पुष्कळ गोष्टींनीं फार चांगली आहे, असें ह्मणण्याला कांहीं अडचण दिसत नाहीं. कारण, तिचें शुद्ध स्वरूप ह्मणजे अमुक, असें आज पुष्कळ वर्षांपासून ठरून गेलें आहे, ही मोठी गोष्ट. तिजमध्यें बहुतेक विषयांवर लहान मोठे ग्रंथ बरेच झाले आहेत, व दिवसेंदिवस अधिकाधिक होत आहेत. तिजमध्यें वर्तमानपत्रें, आणि नियतकालिक पुस्तकेंही बरींच निघत आहेत. तिजमध्यें ज्या ज्या गोष्टींचें साहित्य उणें आहे, तें तें भरून काढण्या विषयीं विद्वान् लोक बराच प्रयत्न करीत आहेत. विश्वविद्यालयामधून त्या भाषेला बाहेर लावून दिलें असल्यामुळें तिच्या प्रसाराला मोठेंच विघ्न आलें ही गोष्ट खरी, तथापि लौकरच तिचा त्या विद्यामंदिरांत पुनः प्रवेश होण्याचा संभव दिसत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

मराठी भाषेच्या ज्या पोटभाषा आहेत, त्यांची स्थिति पाहिली तर ती मात्र चांगली नाहीं असें ह्मणणें प्राप्त होईल. खुद्द मराठीमध्येंच जे अशुद्ध प्रकार आहेत, त्यांनाही तूर्त या पोटभाषांमध्यें गृहीत करण्यास कांहीं बाध दिसत नाहीं. या सर्व भाषांमध्यें सर्वमान्य किंवा शुद्ध प्रकार ह्मणजे अमुक असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. ज्या त्या प्रांतांतील किंबहुना ज्या त्या गांवांतील लोक आपआपली पोटभाषा तीच शुद्ध, तीच प्रौढ, तीच सर्वमान्य, असा आग्रह धरून केव्हां केव्हां भांडतात, परंतु त्या आग्रहांत कांहीं अर्थ आहे असें ह्मणवत नाहीं. कारण कीं पोकळ भांडणा खेरीज त्यां त्या भाषेचा कोणत्याही उपयुक्त गोष्टीमध्यें ते अभिमान बाळगतात असें ह्मणतां येत नाहीं. त्या भाषा केवळ बोलण्याच्या कामापुरत्याच. कागदावर कधीं त्या भाषेतला शब्द पडत नाहीं, तेव्हां पुस्तकाचें नांव तें कशाला? केवळ कौतुकार्थ, किंवा थट्टेसाठीं, किंवा नमुन्यासाठीं क्वचित् कोणीं पांच चार ओळी लिहिल्या असल्या तर! त्यां पलीकडे कांहीं नाहीं. या भाषा बोलणाऱ्या लोकांचा सर्व पत्रव्यवहार पाहिला तर भिन्न भाषेच्या द्वारें. मराठी देशामध्यें मराठीनें, कानडी व मलबार देशामध्यें त्या त्या भाषेनें होतो. त्यांना स्वतंत्र भाषा हें नांव देणें फार कठीण आहे, व दिवसेंदिवस त्यांचें असलें नसलें स्वातंत्र्य तेंही जात चाललें आहे.

३. आतां तिसरी गोष्ट. आमच्या भाषांकडे आह्मी दुर्लक्ष केल्यानें काय परिणाम होणार आहे? प्रथमतः मुख्य मराठी भाषेविषयीं. मराठी भाषेची स्थिति पुष्कळ चांगली आहे असें वर ह्मटलें आहे, तथापि तो तिच्या स्थितीचा चांगुलपणा उणा न होतां, दिवसेंदिवस जर वाढत चालला तरच तिची स्थिति नीट राहील. नाहीं तर एकदा जर का तिचें पा-



ऊल मागें हटलें तर सध्यांच्या वाढत्या इंग्रजी भाषेपुढें तिचें कांहीं चालणार नाहीं. मग ती मागें पडलीच! पोटभाषा तर असून नसल्या सारख्याच आहेत. त्यांच्यामुळें मुख्य मराठी भाषेच्या शुद्धतेला मात्र बट्टा लागत आहे, इतकाच त्यां-पासून लाभ! दुसरें कांहीं नाहीं. या पोटभाषांची अशी ही दीन स्थिति फार शोचनीय आहे यांत संशय नाहीं. ह्मणून या भाषांकडे जर सध्यां लक्ष न दिलें, तर दिवसेंदिवस त्यांची स्थिति अधिकाधिक बिघडत जाणार आणि तसल्या अव्यवस्थित भाषांच्या संसर्गा मुळें शुद्ध मराठी भाषेलाहा त्या त्यक्रमाणानें त्रास होत जाणार असें उघड दिसतें.

४. आतां शेवटच्या प्रश्न. 'त्या भाषांच्या संबंधानें आपलें प्रत्येकाचें कर्तव्य काय?' शुद्ध मराठीच्या संबंधानें आमचें मत असें आहे कीं, जर मराठी भाषेची विशेष सुधारणा झाली पाहिजे, तर त्या सुधारणेचा पहिला मार्ग हा—आपले लौकिक, धार्मिक, राजकीय, यांत्रिक, व्यावहारिक तसेच अर्वाचीन नानाविध शास्त्रसंबंधी जे अनेक विषय, त्यांचीं पुस्तकें, व्याख्यानें, निबंध, आणि ओतप्रोत चर्चा हीं शुद्ध मराठी भाषेनें करण्याचा उद्योग दिवसेंदिवस आपण वाढविला पाहिजे.

असा एक प्रश्न वारंवार निघत असतो कीं पुस्तकें करावीं, अमुक लिहावें, तमुक लिहावें, पण वाचतो कोण? हा प्रश्न खरा आहे, पण त्याचें उत्तर सोपें आहे.

कित्येक पुस्तकें किंवा लेख असे असतात कीं, त्यांना कोणी विचारीतही नाहीं, किंवा त्यांकडे कोणी ढुंकूनही पाहत नाहीं. परंतु कित्येक असे असतात कीं, ज्याला पुस्तक वाचण्याची बिलकूल हौस नाहीं, तशाही मनुष्याच्या कानीं त्याचा कांहीं थोडासा भाग पडला, तर त्याला तें संपूर्ण वाचण्याची पराकाष्ठेची इच्छा होते. याचें कारण काय? तर विषयाची गोडी, आणि त्यांत पुनः लिहिण्याचेंही चातुर्य. "प्रयोजनमनुद्दिश्य मंदोऽपि प्रवर्तते." कोणतीही गोष्ट मनुष्याच्या अंतःकरणाला जाऊन झोंबल्यावांचून तिजकडे त्याचें पूर्ण लक्ष लागायाचें नाहीं. आणि ती तशी झोंबली, ह्मणजे आपोआप तिजकडे तो लक्ष देऊं लागतो. ज्या लेखापासून कांहीं उपयोग नाहीं, किंवा कांहीं नवीन प्राप्त होत नाहीं, त्याकडे कोणीही लक्ष देत नाहीं. याकरितां प्रत्येक लेखकर्त्यानें ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे, कीं ज्यापासून कांहीं तरी नवीन कल्पना, किंवा जुन्या कल्पनांनाच नवें स्वरूप उत्पन्न होईल, असे चणचणीत लेख असल्यावांचून त्यांच्या लेखाला कोणीही विचारणार नाहीं. शिळें खाणें किती दिवस चालेल? इंग्रजी वगैरे भाषांमध्यें ज्यांना नवें नवें कांहीं तरी प्रतिदिनीं मिळतें त्यांना शिळ्या मराठी लेखांची गोडी कशी लागावी? यासाठीं, जुन्या शिळ्या कल्पना, आणि जुन्या शिळ्या गोष्टी, जशांच्या तशा पुढें न आणतां, नव्या नव्या कल्पना, किंवा निदान पक्षीं जुन्या शिळ्या कल्पनानांच ताजी चणचणीत फोडणी देऊन जर त्या ताज्या केल्या तर त्यांची गोडी ग्राहकांना सहज लागेल. पण ही गोष्टही लक्षांत ठेविली पाहिजे कीं कल्पना नवीन असोत किंवा जुन्या असोत, त्यांचा उपयोग काय हें स्पष्ट असलें पाहिजे. नाहीं तर त्यांपासून इष्ट हेतु कधींही साध्य होणार नाहीं. आतां हीच गोष्ट कां ध्याना, कीं "मराठी भाषेचा आणि मराठी ग्रंथाचा उपयोग काय? हा इतका खटाटोप पाहिजे आहे कशाला? आहे इंग्रजी भाषा आयती, ती घ्यावी; तिजमध्यें पुस्तकें आहेत, लेख आहेत,







अनुक्रमणिका

सर्व कांहीं आहे." हें वाक्य केवळ काल्पनिक आहे असें नाहीं. पुष्कळ लोकांची अशीच समजूत आहे. कांहीं दिवसांमागें एका विद्वान गृहस्थानें या मुंबईतील एका प्रसिद्ध सभेमध्यें व्याख्यान दिलें होतें, कीं देशी भाषांचा कांहीं उपयोग नाहीं, त्यांच्या जागीं इंग्रजी भाषाच सर्वत्र चालू होईल तर बरें, इत्यादि. परंतु आमचें ह्मणणें तर असें आहे कीं ज्या देशांतील लोकांना स्वतःचें घरदार नाहीं तर नाहीं, पण स्वतांची भाषाही नाहीं, त्यांचें जिणें व्यर्थ होय! ज्यांची देशभाषा गेली, त्यांच्या हातून कांहीं मोठें कृत्य व्हायाचें नाहीं. आलिकडे मुंबईतील कित्येक पारसी गृहस्थानीं, गेल्या संपूर्ण दहा शतकांमध्यें आपली ह्मणून अंगीकारिलेली जी गुजराथी भाषा, ती सोडून देऊन सर्वत्र घरीं दारीं इंग्रजी भाषाच चालू करावी असा निश्चय केला आहे असें समजतें. परंतु ही गोष्ट सर्व प्रकारें दुश्चिन्हसूचक होय, असें ह्मटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. आह्मी तर असें समजतो, कीं ज्यांनीं देशाची भाषा सोडली, त्यांचा त्या देशाच्या संबंधाचा सर्व अभिमान गेला, ते त्या देशाला परके झाले, त्यांच्या हातून त्या देशाच्या कल्याणाची कांहीं मोठी गोष्ट होणार नाहीं. त्यांची दृष्टि बहिरंग झाली, बाहेरच्या देशाकडे लागली, ते देशांतून दूर जातील तर वाईट नाहीं. आमच्या देशामध्यें जे क्रिश्चन लोक आहेत त्यांचीही भाषेच्या संबंधानें मोठी शोचनीय स्थिति झाली आहे. बहुतेकें क्रिश्चन लोकांना, आणि त्यांत विशेषें करून रोमनक्याथोलिक मताच्या क्रिश्चन लोकांना देशी भाषांचें ज्ञान तांत्रिकच असल्यामुळें, त्यांनीं पोर्तुगीज किंवा इंग्लिश भाषा आपली करण्याचा यत्न चालविला आहे. परंतु त्यांचीही स्थिति हीच. त्यांना या देशाचा किंवा लोकांचा अभिमान जर कांहीं थोडासा असेल, तर तो या कृत्यामुळें दिवसेदिवस नाहींसा होत जाणार; त्यांच्याही हातून या देशाच्या खऱ्या कल्याणाची गोष्ट कांहीं होणार नाहीं. ते आपण होऊन आपणांला इतक्यांतच परके मानूं लागले आहेत. ज्यांच्या पन्नास पिढ्यांमध्यें परदेशीय रक्ताचा लेशही खरोखरीं नसेल, आणि या गोष्टीमुळें ज्यांना, आपण एथले पूर्ण देशीलोक ह्मणविण्याचा मोठा अभिमान वाटावा त्यांना त्या 'देशीलोक' या शब्दाची लाज वाटूं लागली आहे ; आणि कोणी ह्मणतो, मी पोर्तुगीस, कोणी ह्मणतो मी इंग्रेज ! तेव्हां अशा मनुष्यांला या देशाचा आणि या देशांतील लोकांचा कितीसा अभिमान उत्पन्न होणार हें उघड दिसत आहे. देशांतील सर्व लोक एका वळणांत राहण्याला भाषा हें एक मोठें साधन आहे. तें जर नाहीं, तर तितकें त्यांत न्यून पडलें. भाषाभेदापासून मतभेद होतो, आणि मतभेदापासून द्वेषभाव उत्पन्न होण्याला साहाय्य होतें, इत्यादि अनेक कारणांवरून पाहतां, देशभाषा जी आहे तिचा अभ्यास, आणि तिची सुधारणा, आणि व्यवहारामध्यें तिचा होईल तितका उपयोग करण्याविषयीं प्रत्येकानें झटलें पाहिजे. इंग्रजी वगैरे फार उपयोगी ज्या परभाषा आहेत त्यांचा अभ्यास करणें हेंही फार अवश्य आहे खरें, तथापि यावरून देशी भाषेच्या अभ्यासाचें महत्व उणें होतें असें नाहीं. कोणताही विचार, कोणतीही सुधारणा, जर देशांतील लहान थोर सर्व स्त्रीपुरुषांना समजली पाहिजे, जर त्याविषयीं प्रत्येक व्यक्तीनें उद्योग करण्याला झटलें पाहिजे, तर देशभाषेसारखें त्या कृत्याच्या उत्तेजनाला दुसरें साधनच नाहीं. परभाषा तुह्मी कितीही चांगल्या शिका, तथापि त्यांपासून, हा जो आबालवृद्धांच्या अंतः



करणावर होणारा इष्ट परिणाम, तो कधींही साध्य होऊं शकणार नाहीं. यावरून परभाषांचा आह्मी तिरस्कार करितों असें विलकूल कोणी समजूं नये. त्यांच्या अभ्यासांची योग्यता जी आहे ती आहेच ; ती कमी होत नाहीं. तथापि परभाषांची योग्यता कितीही मोठी असली, तरी स्वदेशभाषेच्या अभ्यासाचें महत्त्व तेणेंकरून लेशमात्रही कमी होत नाहीं, इतकेंच आमचें ह्मणणें आहे. तरी पुनः ह्मणतों, कीं जर स्वदेशभाषा, आणि परभाषा यांमध्येंच निवड करण्याचा प्रसंग आला, तर आधीं स्वदेशभाषा आणि मग परभाषा, हेंच आमचें तत्त्व आहे. कारण कीं, ज्यांची देशभाषा मोडली, त्यांचे हातपाय मोडले- त्यांचीं तोंडें बंद झालीं. यापेक्षां आणखी वाईट परिणाम तो कोणता ? सर्व वाईट परिणाम यांत आले. तेव्हां देशभाषेच्या त्यागाचा जर हा सर्वथा अनिष्ट परिणाम, तर उलट पक्षीं त्याच देशभाषेच्या अभ्यासाचा काय उपयोग, हें पुनःपुनः विचार करून सांगण्याचें कारण राहत नाहीं. तेव्हां स्वदेशभाषेच्या संबंधानें प्रत्येकाचें कर्तव्यकर्म ह्मटलें ह्मणजे, हें आहे कीं जितकी ती भाषा शुद्ध ठेवण्याचा प्रयत्न करवेल तितका अवश्य केला पाहिजे. ज्यांच्या व्यवहारामध्यें तिचें कोणत्याही प्रकारें अशुद्ध रूप येत असेल त्यांनीं तें नीट लक्षांत आणून, त्याच्या जागीं शुद्ध रूप योजण्याचा झटून प्रयत्न केला पाहिजे. सांप्रत मुंबईमध्यें एका मोठ्या सभेमध्यें असा एक फार उत्तम नियम केलेला आहे, कीं त्या सभेच्या कोणीही सभासदानें मिश्रित भाषा बोलूं नये. ह्मणजे- अर्धें मराठी आणि अर्धें इंग्रजी असें करूं नये. निदान पक्षीं **एकाच वाक्यामध्यें तरी दोन-भाषांतील शब्द मिश्रित करूं नयेत**. हा फार उपयोगी नियम जर सर्व लोक स्वीकारतील, तर फार उत्तम परिणाम होईल, यांत कांहीं संशय नाहीं. या शिवाय, मराठी भाषेच्या संबंधें मुख्य कृत्य ह्मटलें ह्मणजे इतकेंच, कीं प्रत्येकानें आपणाकडून होईल तितका तिचा अभ्यास चालू ठेवावा. आपले अनेक विचार शुद्ध मराठी भाषेनें बोलून दाखविण्याचा आणि लिहून ठेवण्याचा अभ्यास ठेवावा. ऐतिहासिक गोष्टी, सृष्टिज्ञानसंबंधी विचार, देशस्थिति, लोकस्थिति, इत्यादि अनेक विषयांना अनुलक्षून प्रसंगोपात्त भाषण करावें, लेख लिहावे, ऐकावे; आपण लिहिलेले व इतरांनीं लिहिलेले वाचावे, आणि आपल्या सामर्थ्याप्रमाणें अशा गोष्टींना उत्तेजन द्यावें. यांमध्यें सर्व आलें. इतकें जर प्रत्येक मनुष्यानें लक्षांत ठेविलें तर पुष्कळ झालें.

आतां मराठी भाषेच्या आसपास ज्या पोटभाषा आहेत, त्यांच्या संबंधानें कांहीं लिहिणें अवश्य आहे. त्या भाषांची स्थिति फार वाईट आहे, असें वर ह्मटलेंच आहे. परंतु त्या भाषांची स्थिति सुधारण्याला आतां करावें काय, हा प्रश्न येऊन उभा राहिला. असें जर ह्मटलें, कीं शुद्ध मराठी भाषेचा अभिमान धरून तिची सुधारणा करण्याचा जो उपाय वर सांगितला आहे, तोच उपाय त्या भाषांच्या संबंधानें चालविला, तर काय अडचण येईल? बरें, पाहूं तर खरें. तोच उपाय करायाचा ह्मटलें ह्मणजे, काय काय बरें केलें पाहिजे? तर प्रथमतः प्रत्येक भाषेचें एकेक व्याकरण, एकेक कोश, आणि बरींच वाचनपुस्तकें, इतकें आधीं तयार केलें पाहिजे.

शाळांमध्यें तीं शिकविलीं पाहिजेत; इतिहासादि अनेक विषयांचे ग्रंथ केले पाहिजेत; वर्तमानपत्रें वगैरे सर्व प्रकार त्या त्या भाषेंत झाला पाहिजे. परंतु हें सर्व होऊं शकणारें






अनुक्रमणिका

आहे काय? प्रांतोप्रांतीं, किंबहुना गांवोगांवीं अशा भाषा वेगळ्या वेगळ्या आहेत. त्यांत पुन: ब्राह्मणादि जातींच्या वेगळ्या, शूद्रादि जातींच्या वेगळ्या. तेव्हां अशा निरनिराळ्या भाषा देशामध्यें किती करायाच्या? परंतु असेंही कोणी ह्मणूं शकेल कीं कितीही होतना, त्याचें काय? ज्याला त्याला आपापल्या भाषेचा अभिमान नको कां? पण हीही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं आपापल्या भाषेचा अभिमान जर पूर्वीं पासून सर्वांनीं ठेविला असता, तर इतक्या वेगवेगळ्या भाषा झाल्याच नसत्या. अभिमान सुटल्यामुळेंच ही स्थिति झाली आहे. परंतु असा पूर्वपक्ष होईल कीं, गेली ती गोष्ट गेली, पण इतःपर आह्मी आमच्या भाषांचा अभिमान धरूं. आह्मी ह्मणूं, फार उत्तम गोष्ट आहे, पण जर असें करूं शकाल तर. आह्मी तर खात्रीनें सांगूं शकतों, कीं ही गोष्ट अशक्य आहे. कां अशक्य? तर प्रथमतः ही व्यवस्था उत्पन्न करण्याला आणि निरंतर चालू ठेवण्याला द्रव्याचा किती भयंकर व्यय करावा लागेल, हें पाहिलें पाहिजे. इतकें द्रव्य कोणीही काढूं इच्छिणार नाहीं. आग्रहास पडून कोणी मातबर मनुष्य या कृत्याला लागेल तितका पैसा द्यावयाला उभा राहिला तरी त्याच्यानेंही हें कृत्य तडीस नेववणार नाहीं, आणि कदाचित् सिद्धीस नेलें, तरी असें ह्मणणें प्राप्त आहे कीं तें केवळ वेडेपणाचें काम होईल. यासाठीं तें द्रव्य याहून चांगल्या अशा दुसऱ्या एकाद्या कृत्याला खर्चावें हें चांगलें. कारण कीं, या कृत्यापासून पैशाचा पैसा फुकट जाऊन, कांहीं लाभ न होतां, हानि मात्र मोटी होईल. क्षणभर असें समजूं कीं गांवोगांव वेगवेगळ्या भाषा कायम झाल्या, त्यांची वेगवेगळीं पुस्तकें सिद्ध झालीं. परंतु असल्या संकुचित भाषांपासून केवढा मोठा तोटा होणार आहे तो पाहिला पाहिजे. मराठीसारख्या स्थायिक झालेल्या प्रौढ भाषेमध्यें जें आज विद्येचें भांडार वाढत चाललें आहे, तें या लोकांना सर्वथा निरुपयोगी होईल. तें प्राप्त करून घ्यायाचें असेल तर मराठीचा अभ्यास वेगळा केलाच पाहिजे. या गांवचें वर्तमानपत्र त्यागांवीं व त्यागांवचें या गांवीं कोणाला समजायाचें नाहीं. अर्थात् तें निरुपयोगी. एका गांवच्या लोकांनीं दुसऱ्या गांवच्या लोकांस पत्र पाठवायाचें तर प्रश्न एका भाषेंत आणि उत्तर दुसऱ्या भाषेंत असें झालेंच पाहिजे. कारण अभिमानाची गोष्ट पडली. वीस वर्षांमागें युरोपखंडामध्यें फ्रान्स आणि जर्मनी या दोन राज्यांमध्यें जेव्हां मोठा युद्धसंग्राम होऊन फ्रान्साचा मोड झाला, तेव्हां जर्मनी देशाच्या बादशाहानें आपल्या जयाचें आनंदकारक वर्तमान रुशिया देशाच्या बादशाहाला लिहून कळविलें. युरोपखंडामध्यें निरनिराळ्या राज्यांचा परस्पर पत्रव्यवहार पूर्वीपासून फ्रेंच भाषेनें चालत आलेला आहे. परंतु जर्मन लोकांना असा गर्व झाला कीं, ज्यापक्षीं आपण फ्रेंचांचा पराभव केला, त्यापक्षीं त्यांची भाषा आतां आपणाला कशाला? आमचीच भाषा आह्मी चोहोंकडे चालवूं. अशा अभिमानानें त्यांनीं आपलें पत्र जर्मन भाषेनें लिहून पाठविलें. परंतु जें उत्तर आलें तें पाहतात तों फ्रेंच भाषेंतही नाहीं, आणि, जर्मन भाषेंतही नाहीं, तर रशियन भाषेंत! तेव्हां राव शुद्धीवर आले, आणि दुसरें पत्र पाठवितांना पूर्ववत् फ्रेंच भाषेचा त्यांनीं आश्रय केला. तेव्हां सर्व गोष्टी पूर्ववत् टीक चालू झाल्या. अभिमानाची गोष्ट ह्मटली ह्मणजे तेथें असाच परिणाम व्हायाचा. मराठी लोकांना जर कोंकणी लोकांनीं किंवा



अनुक्रमणिका

गोमंतकी लोकांनीं पत्र पाठवायाचें तर सध्यां प्रमाणें मराठी भाषेनें पत्र लिहिलें असतां कमीपणा घेतल्या सारखें होणार. स्वतःच्या भाषेनें पत्र लिहावें, तर तें वाचण्याची खटपट करतो कोण? तेव्हां असा वेडा अभिमान कामाचा नाहीं. शुद्ध मराठीचा आश्रय केल्यावांचून कांहीं चांगला परिणाम व्हायाचा नाहीं. पण असें जर करावें तर अभिमान राहिला कोठें? आणि मराठी भाषेच्या संबंधानें लिहितांना जी इतकी देशाभिमानाची तरफ ताणली आहे तिचा काय उपयोग? पण असें नव्हे. मराठीच्या संबंधानें जें कांहीं लिहिलें आहे तें योग्य आहे, परंतु ती गोष्ट एथें लागू होत नाहीं. तें कसें ह्मणाल तर पहा. मराठीचा आणि परभाषांचा जो परस्पर संबंध आहे तो वेगळा. आणि तिचा आणि तिच्या पोटभाषांचा जो संबंध आहे तो वेगळा. या पोटभाषा जरी मराठीहून एका प्रकारें भिन्न आहेत, तथापि त्यांपैकी बहुतेक मराठीपासूनच अपभ्रंशरूपानें उत्पन्न झाल्या आहेत, किंवा फारच भेद ह्मटला तर मराठीचें मूळ आणि त्यांतील क्रियेकींचे मूळ तरी एकच आहे. यामुळें त्यांच्यामध्यें आणि मराठीमध्यें फार मोठासा भेद नाहीं. कांहीं विशेष शब्द आणि कांहीं विभक्तिरूपें शिवाय करून पाहिलें असतां, एकंदर भाषाशैलीच्या किंवा शब्दसंग्रहाच्या दृष्टीनें फारसा भेद नाहीं. लिंगभेदादिकांमध्यें सुद्धां फार सादृश्य आहे. बोलण्याचा जो झोंक किंवा सूर त्यामध्यें मात्र बरेंच अंतर पडतें. अशा कारणांवरून पाहतां, मराठीला सोडून स्वतंत्ररूपानें राहण्याची त्यांच्या आंगीं योग्यताही नाहीं, आणि त्यांना ती गोष्ट शोभणारही नाहीं. सध्यां कागदोपत्रीं तर त्यांच्या ऐवजीं मराठी भाषा घेतलीच आहे. तेव्हां आमचें ह्मणणें इतकेंच कीं, अपभ्रंशरूपानें असोत किंवा कोणत्याही कारणानें असोत मराठीच्या पोटभाषा ह्मणून जितक्या आहेत, त्यांतील कोणतीही भाषा बोलणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें ही गोष्ट पूर्णपणें ध्यानांत ठेविली पाहिजे कीं मराठी भाषेपासून आपली भाषा वेगळी नाहीं, वेगळेपणा फारफार मानिला तरी एका पिढीच्या आंतला आहे. त्यापक्षीं त्यांची सुधारणा करणें व त्यांचा अभिमान धरणें ह्मणजे इतकेंच कीं त्या भाषांमध्यें आणि मराठीमध्यें जो जो ह्मणून भेद दृष्टीस पडतो, तो तो सोडून देऊन त्या भाषांनाच शुद्ध मराठीचें स्वरूप द्यावें. कोणी ह्मणेल कीं त्या भाषा निखालस टाकून देऊन मराठी भाषाच घ्या असें स्पष्ट कां नाहीं ह्मणत ? संकोचित भाषण कां करितां ? तर हें ह्मणणें योग्य नाहीं. कारण या पोटभाषा जर मराठीहून अगदी भिन्न असत्या तर तेथें, त्या टाका आणि ही नवी ह्मणजे मराठी भाषा घ्या, हें ह्मणणें शोभतें. परंतु जर त्या वेगळ्या नाहींतच, तर त्या टाका, आणि ही घ्या, हें ह्मणणें लागतच नाहीं. आणि जरी त्या वेगळ्या मानिल्या तरी त्या टाका असें ह्मणण्याचें आतां कारणच राहिलेलें नाहीं; कागदोपत्रीं व पुस्तकादि लेखांमध्यें त्यांचा कधींही आदर झालेला नाहीं; त्यांना मुळींच सोडून देऊन तुह्मी मराठीचें कधींच ग्रहण केलें आहे. तेव्हां त्यांचा वेगळेपणा तो राहिला आहे कोठें? वास्तव पोकळ आग्रहास न पडतां, जसें लेखांमध्यें मराठीचें निर्विवाद ग्रहण केलें आहे, तसें बोलण्यामध्यें ही शुद्ध मराठी भाषा योजण्याचा सर्व महाराष्ट्र जनांनीं, ह्मणजे सध्यां मराठीच्या पोटभाषा बोलणारांनींही निश्चय करावा, आणि त्याप्रमाणें चालण्याची रीत एकदम सुरू करावी. हीच त्या पोटभाषांची सुधारणा. दुसरा मार्ग नाहीं. त्या पोटभाषांना मान नाहीं, त्या अशु



भाषा मानल्या जातात, इतकेंच नव्हे, पण त्या ओंगळ अप्रतिष्ठित मानल्या जातात. यामुळें त्या बोलणारांना चारचौघांमध्यें मान खालीं घालावी लागते. स्वतःच्या घरीं जरी असें न घडलें तरी आपापल्या ठिकाणाबाहेर ते गेले, ह्मणजे अभ्यास नसल्यामुळें त्यांना शुद्ध बोलतां येत नाहीं, आणि मग फटफजीतीला पारावार नाहींसा होतो. यास्तव मराठीवांचून गत्यंतर नाहीं, आणि जर गत्यंतर नाहीं, तर एकदम तिचा स्वीकार करण्यासारखें दुसरें शहाणपण नाहीं. शुद्ध भाषा बोलतां येणें हा सभ्यमनुष्याचा एक अलंकार आहे, आणि सुशिक्षितपणाचें एक अंग आहे. आणि याच्या उलट जी स्थिति ती निःसंशय लांछनास्पद आहे, ही गोष्ट प्रत्येक मनुष्यानें ध्यानांत ठेविली पाहिजे. अभिमानादि सर्व गोष्टींचा पूर्वींच निकाल केला आहे. सारांश शुद्ध मराठीचा खरा अभिमान धरणें, हाच पोटभाषांचा अभिमान होय, दुसरा नाहीं.

ही सर्व गोष्ट मान्य केली, तरी एक अडचण राहते. ती कोणती? तर ज्यांना शुद्ध मराठी भाषा बोलतां येत नाहीं, मुळींच मराठी बोलण्याचा अभ्यास नाहीं, आणि आसपास शुद्ध बोलणारेही कोणी सांपडत नाहींत, तर त्यांनीं कसें करावें?—या प्रश्नावरून इतकें तरी ह्मणतां येतें कीं त्यांना शुद्ध भाषा शिकण्याची इच्छा आहे, असें गृहीत करण्यास बाध नाहीं. ह्मणून त्यांना इतकेंच सांगणें योग्य आहे, कीं परको लोकांना जरी मराठी भाषा कठीण वाटण्यासारखी कदाचित् असली, तरी या पोटभाषांतून कोणतीही एकादी पोटभाषा ज्याची जन्मभाषा आहे, त्याला शुद्ध मराठी भाषा शिकणें फार अवघड नाहीं. इतकेंच कीं त्यानें श्रम घेऊन थोडासा अभ्यास केला पाहिजे. मराठी पुस्तकें आतां पुष्कळ झालीं आहेत, तीं वाचण्याचा थोडथोडा त्यानें परिपाठ ठेवावा, ह्मणजे सहजच त्याची त्यांमध्यें गति होत जाईल. आमची इच्छा अशी आहे कीं या कामीं आह्मांकडून होईल तितकें आह्मी साहाय्य करावें. ह्मणून सर्व विद्वान् लोकांस आमची विनंती आहे कीं, ज्या ज्या प्रांतीं मराठी भाषेमध्यें जे जे अशुद्ध प्रकार आढळतील ते ते त्यांनीं कृपाकरून आह्मांस कळवावे. ह्मणजे ते प्रकार आणि त्या संबंधीं आमची स्वतःची माहितीही जी असेल ती आह्मी मोठ्या आनंदानें प्रसिद्ध करूं. ज्यांना लिहितां येत नाहीं त्यांना, ज्यांना येत त्यांनीं जर मदत केली, तर क्रमशः सर्व गोष्टी सिद्धीस जातील. अगदीं निरक्षर आणि अशिक्षित लोकांमध्यें या गोष्टींचा एकाएकीं प्रसार होणें अमळ कठीण आहे असें प्रथमतः वाटतें खरें. परंतु केवळ शुद्ध भाषा ऐकल्यानेंही केव्हां केव्हां अशुद्ध भाषा शुद्ध होण्याच्या मार्गास लागते. पण इतकें कशाला? ज्यांना लिहितां वाचतां येतें, त्यांच्या पुरतीच जरी आज ही सुधारणा झाली, तरी तें मोठेंच काम झालें असें ह्मटलें पाहिजे. हळूहळू पुढें क्रम सुरू ठेविल्यानें सर्व नीट होत जाईल.

कित्येक वृद्ध लोकांनाही शुद्ध भाषा शिकण्याची फार हौस असते, आणि तेही मोठ्या अगत्यानें शिकतात. शिकविणारा कोणी मिळत नसला तर मात्र त्यांचा उपाय चालत नाहीं. परंतु जर कदाचित् वृद्धांना, आणि कित्येक तरुणांनाही हा उद्योग आवडला नाहीं, तर त्यांत काय झालें? ज्यांना ज्यांना इच्छा आहे त्यांनीं तो स्वतः अभ्यास करावा, आणि इतरांनाही त्यापासून होणारे फायदे दाखवून द्यावे. जे ऐकतील ते ऐकोत. ज्यांना



ती गोष्ट आवडेल ते ती घेतील. इतर नाहीं घेणार; इतकेंच; दुसरें काय? पण एकपक्षीं वृद्धलोकांना या कामीं फार तसदी देण्याचें प्रयोजनच नाहीं; कारण आपोआप मागें पडत जाणारे ते लोक. ह्मणून जेव्हां त्यांच्या ठायीं इच्छा आहे असें दृष्टीस पडेल, तेव्हां अवश्य त्यांना त्या कामीं मदत करावी. परंतु जेथें इच्छेचा अभाव किंवा कंटाळा दिसेल, तेथें आग्रह चालविण्याच्या भरोस पडणें अयोग्य होय. नवीन संततीला मात्र मुळापासून शुद्धच भाषा शिकविण्याचा प्रघात होईल तितका अगत्यानें ठेवावा. एकदा तो चालू झाला ह्मणजे मग त्यामध्यें कांहीं अडचण येणार नाहीं. याकामीं बायकांमंडळीचें मोठें साहाय्य पाहिजे आहे. त्यांना आपण शुद्धच भाषा बोलावी अशी नैसर्गिक इच्छा असते. नवीन नवीन सुंदर सुंदर पोषाखांची आणि नवीन नवीन चांगल्या चांगल्या दागीन्यांची जशी त्यांना मोठी हौस, तशीच आपणांस चांगली शुद्ध भाषा बोलतां यावी अशी त्यानां फार हौस असते. परंतु स्त्रिया ह्मटल्या ह्मणजे स्वभावत: अंमळ लज्जाशील, ह्मणून त्यांना हा नवीन प्रकार घेण्याला पुरुषांनींच आरंभीं उत्तेजन देऊन, अडल्या प्रसंगीं होईल तितकें साहाय्य केलें पाहिजे. एकदा तो संकोचरूपी अडथळा दूर झाला ह्मणजे मग पुढें कांहीं अडचण येणार नाहीं. आणि भाषा शिकण्याच्या कामीं पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या अंगीं अधिक सामर्थ्य आहे असें सहज दृष्टीस पडेल.

कित्येकांची अशी एक अडचण असते, कीं ते ह्मणतात आह्मांला मुळापासून आपल्या मंडळीमध्यें आमच्या जन्मभाषेहून वेगळी भाषा बोलण्याचा अभ्यास नसल्यामुळें तशा मंडळीमध्यें मराठी भाषा बोलण्याला मोठा संकोच वाटतो, इतकेंच नव्हे, तर तो नवा प्रकार केवळ थट्टेसारखा वाटतो, आणि मनमोकळें पोटभर त्या भाषेनें बोलण्याला उल्हास येत नाहीं, कसेंसेंच वाटतें, आणि मनाचें समाधान होत नाहीं, त्याला काय करावें? पण कोणतीही नवी रीत चालू केली ह्मणजे प्रथमतः तसें वाटावयाचेंच. इंग्रजी भाषा शिकणारांना ही गोष्ट माहित आहे कीं आरंभीं कांहीं दिवस पर्यंत त्या भाषेनें बोलण्याला फार शरम वाटते. चुका झाल्याबद्दल किंवा नवा प्रकार घेतल्याबद्दल कित्येक लोक थट्टाही करितात. परंतु हें सर्व आठ पंधरा दिवस किंवा फार तर महिना दोन महिने चालतें. पुढें मग कांहीं नाहीं. तोच प्रकार एथें व्हायाचा. आपापसामध्यें इंग्रजी सारख्या अगदी भिन्नभाषेनें जर आह्मी निःशंकपणें बोलतों, तर शुद्ध मराठीनें बोलण्यालाच आह्मांला संकोच वाटावा, आणि त्या संकोचाला भिऊन आह्मीं तो उद्योग सोडून द्यावा, हीच मोठी लज्जेची आणि नादानपणाची गोष्ट आहे. सारांश, असल्या पोरकट शंकांमध्यें कांहीं अर्थ नाहीं हेंच सत्य.

आणखी असा एक प्रश्न आहे कीं कानडा जिल्ह्यामध्यें आणि पलीकडे दक्षिणेस समुद्रतीरीं कोची प्रांतीं जे कोंकणी भाषा बोलणारे सहस्रावधि लोक राहत आहेत त्यांनीं काय करावें? त्यांच्या देशीं मराठी भाषा नाहीं. देशभाषा ह्मटली ह्मणजे कानडी, मल्याळी, किंवा मलबारी. त्यांच्या कोंकणी भाषेची स्थिति पाहिली, तर मालवणी किंवा गोमंतकी पेक्षांही वाईट. त्यांनीं जर ती भाषा सोडावी, तर मग घरची भाषा मराठी करावी, किंवा ती ती देशभाषाच घरीं चालवावी? हा प्रश्न बिकट दिसतो खरा, परंतु याचा निकाल सरळ आहे. कारण त्या गोष्टीचा आह्मी आमच्या मतें कसाही निर्णय केला, तरी तो त्या लोकांच्या कानीं





अनुक्रमणिका

जाऊन पडण्याचीच प्रथमतः मोठी भ्रांति, तेव्हां त्याप्रमाणें वागणें किंवा न वागणें ही दूरची गोष्ट होय. परंतु जर हा लेख मूळरूपानें किंवा निदान भाषांतररूपानें तरी त्यांच्या पाहण्यांत येईल आणि जर त्यांना हा विषय विचार करण्यासारखा आहे इतकें वाटूं लागेल, तर आमची अशी खात्री आहे कीं, त्यांना जो योग्य मार्ग तो सहज मिळेल. तो असा—देशभाषा ज्या आहेत, त्यांचा तर ते सध्यां अभ्यास करीतच आहेत. त्या प्रमाणेंच इतउत्तर पुढेंही तो अभ्यास त्यांनीं चालविला पाहिजे. कारण देशभाषेवांचून गत्यंतर नाहीं. परंतु ती भाषा सहज होते, शाळां मध्यें तिचा अभ्यास चालतो, कामकाजामध्यें वहिवाटीनें ती येते. परंतु घरीं बोलायाची जी भाषा तिच्याजागीं त्यांनीं ती ती देशी भाषा घ्यावी अशी आह्मी कधींही संमति देणार नाहीं. त्यांना स्वभाषा सोडून, देशी भाषाच घरीं चालवा अशी कोणी शिफारस करील, तर आह्मांला ती गोष्ट मान्य होणार नाहीं. बेहेत्तर त्यांची ती अशुद्ध कोंकणी भाषा आहे तशीच पाहिजे तर चालू ठेवावी, आणि बाहेरच्या व्यवहारामध्यें मात्र देशी भाषा चालवावी. परंतु कोणत्याही सबबेनें आपल्या घरच्या भाषेमध्यें त्यांनीं असा बिघाड उत्पन्न होऊं देऊं नये. तसा बिघाड झाल्यास नफ्या पेक्षां नुकसान फार मोठें होईल. प्रथमतः कदाचित् तें लक्षांत येणार नाहीं, परंतु थोडासा विचार करून पाहिला तर आमच्या ह्मणण्याचा खरेपणा सहज ध्यानांत येईल. आह्मी ह्मणतों, नफ्या पेक्षां नुकसान फार होईल; फार फार नुकसान होईल; त्या नुकसानाची कल्पना सुद्धां कितीएकांच्या लक्षामध्यें एकाएकीं येणार नाहीं. इतकें मोठें नुकसान होईल. असें तें नुकसान कोणचें, असा सहज प्रश्न होणार. आमच्या ह्मणण्याचा खरेखोटेपणा पहा. त्यांची जो ही सध्यांची कोंकणी भाषा आहे, हा त्यांचा सहस्रावधी वर्षांचा जागता इतिहास होय. जरी ते शेकडों वर्षें परदेशामध्यें जाऊन राहिले आहेत, तरी ते कोण? तर सर्वभरतखंडामध्यें ज्यांपासून वेदादि विद्यांचा प्रसार झाला, ज्यांपासून देशांत मुळीं ज्ञानांकुर पसरला, त्या आर्यांचे हे अव्यवहित वंशज आहेत असें या त्यांच्या इतिहासावरून सहज समजतें. हे मूळचे उत्तरदेशीय असल्यामुळें महाराष्ट्रादि सांप्रतकाळच्या आर्यलोकांशीं जितका त्यांचा मूळचा निकट सहोदरसंबंध आहे, तितक्याचा शतांशही त्यांचा द्रविडांशीं मूळचा संबंध नाहीं. यावरून आह्मी द्रविडांचा तिरस्कार करितों असें कोणीहि समजूं नये. परंतु आमचें ह्मणणें इतकेंच कीं, सद्भाग्यानें ह्मणा, किंवा भाग्याभाग्याची गोष्ट मनांत न आणिली तरी, सहजगत्या ह्मणा, ज्यांना मूळचें आर्यत्व आहे, त्यांनीं आपल्या आर्यत्वाची मोठी खूण जी आपली भाषा ती आपण होऊन टाकून देणें ही गोष्ट फार अयोग्य होय. त्यांनीं मराठी भाषाच घेतली पाहिजे. त्यांना मराठी भाषा अवघड जाणार नाहीं हें वर सांगितलेंच आहे. येणेंकरून दुसरा एक मोठा चांगला परिणाम होईल. तो असा—देशभाषा जी द्रविडजातीय आहे, तिचें लौकिक कामकाजाच्या संबंधानें त्यांनीं ग्रहण केलें असल्यामुळें, आर्यांचा आणि द्रविडांचा स्नेहभाव कायमचा कायम राहून, आर्यांचें आर्यत्वही कायम राहील. जर त्यांनीं घरींही द्रविडजातीय भाषा घेतली, तर त्यांचा जो अनादिसिद्ध उत्तरदेशीय लोकांशीं निकट संबंध आहे तो, आणि त्यांचें उत्तरदेशीयत्व हीं दोन्ही एकदम तुटून जातील, आणि भाषेच्या संबंधानें आह्मांला ते केवळ परकीय बनतील. ही गोष्ट आ-



अनुक्रमणिका

झाला तर इष्ट नाहीं. जे ह्मणत असतील कीं, त्यांत काय आहे? दुहेरी भाषा कशाला पाहिजेत? एक देशी भाषा आहे तीच सर्वत्र कायम केली ह्मणजे झालें, त्यांनीं या गोष्टीचा नीट विचार करावा, आणि मग हवें तसें करावें. परंतु आह्मांला तर ती गोष्ट पसंत नाहीं, असें आह्मी पुन: ह्मणतों. ज्यांना, महाराष्ट्र देशाशीं आणि महाराष्ट्र लोकांशीं आपलें कांहीं कर्तव्य नाहीं असें वाटत असेल, त्यांनीं मराठी भाषेशीं असलेला आपला प्राचीन संबंध पाहिजे तर बेलाशक तोडून टाकावा. परंतु त्यांनीं इतकें खचित समजावें, कीं तसें करणें ही त्यांची मोठी चूक होईल, आणि एकदा हातून गेलेली गोष्ट पुन: सुधरून घेणें फार कठीण, किंबहुना अशक्य होऊन जाईल.

याप्रमाणें गृहीत विषयाच्यां संबंधाच्या बारही गोष्टींचें विवेचन केलें. यावरून आतां आपल्या भाषांचें पुढें काय व्हायाचें, याचा निश्चय जरी नव्हे, तरी सामान्यतः झोंक सहज लक्षांत येईल.

आमच्या भाषांच्या सुधारणेला अनुकूल गोष्टी कोणत्या आणि प्रतिकूल कोणत्या, हेंही आमच्या मतें आह्मी स्पष्ट केलें आहे. अनुकूल गोष्टी जर दिवसेंदिवस प्रबल होत जातील, तर आमच्या भाषांचा भरभराट होत जाईल, नाहीं तर त्यांचा मोड होत जाईल हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. तथापि मराठी भाषेचे अभिमानी सर्व लोक या सर्व गोष्टींचा चांगला विचार करितील, आणि तिची योग्य सुधारणा आणि योग्य भरभराट करण्याकडे आपलें पूर्ण लक्ष देतील, अशी पूर्ण आशा धरून, हा विषय आतां आटपता घेतों.

---

या विषयांच्या संबंधानें ज्या कोणांस कांहीं सुचवायाचें असेल, किंवा आपलें मत प्रसिद्ध करायाचें असेल, त्यांनीं तें आह्मांकडे लिहून पाठविल्यास, अनुकूळ किंवा प्रतिकूळ कसेंही असो, त्याला मोठ्या संतोषानें या पुस्तकांत स्थळ दिलें जाईल



---

# कानडी भाषा.

कानडी भाषा बोलणाऱ्या लोकांचा प्रदेश ह्मणजे कर्नाटक हें महाराष्ट्र देशाला अगदीं चिकटून आहे. इतकेंच नव्हे, पण महाराष्ट्र देशाचा दक्षिण भाग, आणि कर्नाटकाचा उत्तर भाग हे परस्परांमध्यें अतिशय मिसळून गेले आहेत. दक्षिण महाराष्ट्र देश अशी ज्याला संज्ञा आहे तो मूळचा कर्नाटकाचा भाग असें कानडी लोकांचें ह्मणणें आहे, आणि हें ह्मणणें कदाचित् खरें असेल, असें मानण्याला पुष्कळ आधार दिसतो. पण अशी कांहीं चमत्कारिक स्थिति झाली आहे कीं, मराठी भाषा आणि कानडी भाषा या मुळीं परस्परांपासून अगदीं भिन्न जरी होत्या, तरी या दक्षिण महाराष्ट्र देशीं त्यांचा परस्परांशीं सध्यां इतका निकट संबंध जडला आहे कीं, येथील कित्येक स्थळांची भाषा कानडी किंवा मराठी हें निश्चितपणें सांगणें फार कठीण पडतें. येथील भाषा मराठी ह्मणावी, तर तिजमध्यें कानडी शब्दांची व कानडी तऱ्हेच्या वाक्यांची भेसळ पुष्कळ दिसते; इतकेंच नव्हे तर तिजमध्यें मराठी भाषेचा सूर, ह्मणजे भाषणाचा झोक जो मराठी वळणावर असायाचा, तो सुद्धां जाऊन त्याच्या जागीं कानडी सूर बनलेला दृष्टीस पडतो. बरें, एथील भाषा कानडी ह्मणावी, तरी ति-




अनुक्रमणिका

जमध्यें मराठीचें मिश्रण पुष्कळ दिसतें, आणि बहुतेक कानडी लोकांनाही कानडीपेक्षां मराठीची गोडी अधिक असते. या मिश्रित स्थितीला कारणें अनेक झालीं आहेत. राजकीय कारणानें ह्मणा, धर्मसंबंधी कारणानें ह्मणा, किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणानें ह्मणा, या प्रदेशीं आणि विशेषेंकरून एथील शहरच्या वस्तीमध्यें, मराठी आणि कानडी या दोहों जातींच्या लोकांचें मिश्रण फार झालें आहे. सध्याच्या काळीं त्यांच्या त्यांच्या भाषांवरून मराठी लोक कोण आणि कानडी लोक कोण, हें सहज लक्षांत येतें खरें, तथापि कानडी लोकांमध्यें जे ब्राह्मण आहेत ते, आणि लिंगायत आणि जैन यांमध्यें ही जे पुरातनकाळीं मोठमोठे विद्वान होऊन गेले, ते व त्यांचे वंशज हे मूळचे कर्नाटकी होते, असें ह्मणण्यापेक्षां, ते मूळचे संस्कृत भाषा बोलणारे महाराष्ट्र, किंवा महाराष्ट्र नसले तरी उत्तरदेशीय दुसऱ्या कोणत्याही आर्य कुळांतले होते, असें ह्मणण्याकडे आमचा अधिक कल धांवतो. निदान इतकें तरी ह्मणणें अवश्य दिसतें कीं कानडी भाषेची जी आजपर्यंत सुधारणा होत आली आहे तिला मूळकारण महाराष्ट्र भाषा, किंवा महाराष्ट्र नाहीं तर संस्कृत भाषा तरी होय. कानडी भाषेमध्यें जो संस्कृत भाषेचा अंश आहे तो आर्यांच्याच द्वारें तींत आला आहे असें उघड दिसतें. संस्कृत व मराठी भाषांशीं कानडी भाषेचा कांहीं संबंध नाहीं, असें ह्मणण्याकडे आलीकडे कित्येक लोकांचा फार कल झालेला दृष्टीस पडतो; परंतु त्याचा अर्थ इतकाच घ्यायाचा, कीं कानडी भाषेचें जें अत्यंत प्राचीन स्वरूप, तें द्रविडभाषेला फार निकट आहे, आणि त्या प्राचीन स्वरूपाचा मात्र संस्कृत किंवा मराठी भाषांशीं संबंध नाहीं. पण सध्यांची जर कानडी भाषा घेतली, तर तिजमध्यें अर्धाहून अधिक भाग संस्कृताचा आणि संस्कृतापासून उत्पन्न झालेल्या महाराष्ट्री इत्यादि प्राकृत भाषांचा आहे असें ह्मणणें प्राप्त आहे. आणि तो भाग जर काढून टाकिला, तर 'कानडी भाषा' अगदी लंगडी, पांगळी, निरुपयोगी, अशी होऊन जाईल. मराठी लोकांच्या सहवासानें कानडी भाषा बिघडली, असें ह्मणणाऱ्या लोकांनीं इतकें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मुळीं आर्यांच्या उद्योगानेंच कानडी भाषेंत ग्रंथोत्पत्ति झाली. कानडी भाषेशीं सहवास ठेवणारे आर्य ह्मटले ह्मणजे प्रायः ते महाराष्ट्रच असले पाहिजेत, आणि मराठ्यांच्या सहवासानें कानडीमध्यें शब्दांचा भरणा अधिक झाला आहे. असो, या वादांत विशेष मन घालण्यापेक्षां, घटकाभर असें मानूं कीं कानडी भाषा मराठ्यांच्या सहवासानें बिघडली खरी; कारण कीं मध्यें कांहीं काळपर्यंत या प्रदेशीं मराठ्यांचें राज्य असल्यामुळें कागदोपत्रीं मराठी भाषाच होऊन गेली, आणि कानडी भाषेचा कानडी लोकांनाही कंटाळा येऊन गेला. एकपक्षीं हा राजकीय स्थितीचा परिणाम असल्यामुळें, याबद्दलचा दोष मराठ्यांना द्यावा किंवा कानड्यांना द्यावा, याचा निश्चय करणें हें अत्यंत कठीण काम आहे; व या विचारामध्यें दुसऱ्या कित्येक गोष्टींचा विचार येऊन घुसूं लागेल. याकरितां तो विषय सोडून देऊन, पुढें कानडी भाषेची सुधारणा करण्याचा मार्ग कोणता या विषयाकडे लक्ष देऊं.

कानडी भाषेची सुधारणा करण्याचे निरनिराळे मार्ग निरनिराळे लोकांनीं दाखविले आहेत. कोणी ह्मणतात कीं मराठी भाषेंतील जितके शब्द कानडींत मिसळले आहेत तितक्या सर्वांना एकदम फाटा द्यावा. परंतु आह्मां





अनुक्रमणिका

ला वाटतें कीं या कामीं फार सावधगिरी ठेविली पाहिजे. सरसकट मराठी शब्दांना हरताळ लावूं नये. ज्यांच्या जागीं फार चांगले कानडी शब्द सध्यां प्रचारांत आहेत, असे मराठी शब्द दूर करण्यास हरकत नाहीं; परंतु जर रूढ भाषेंत एकादा अर्थ प्रकट करण्यास चांगला कानडी शब्द नाहीं, आणि त्याचें काम एकादा मराठी शब्द फार चांगल्या रीतीनें चालवीत आहे, तर शब्द मराठी आहे इतक्या साठींच तो टाकून देऊन, हळेगन्नड (प्राचीन कानडी) भाषेंतील दुसरा कोठचा तरी अज्ञात शब्द शोधीत बसणें हें चांगलें नाहीं. कित्येकांचें ह्मणणें आहे कीं तिमध्यें आलेले सर्व संस्कृत शब्दही झुगारून देऊन निवळ कानडी शब्दच वहिवाटींत ठेवावे. परंतु हा प्रयत्न कितपत साध्य आहे, याची कल्पना आज आमच्यानें करवत नाहीं. बरें. जरी कदाचित् हा साध्य होण्यासारखा असला, तथापि तो हितकारक मात्र होणार नाहीं, अशी आमची समजूत आहे. तेणें करून ती भाषा मूळच्या स्थितींत जाऊन पडेल असें आह्मांस वाटतें. तीच स्थिति उत्तम असें जर कोणाचें ह्मणणें असेल, तर तें मात्र आह्मांला संमत होणार नाहीं. हा मतभेदाचा प्रकार खरा परंतु याला एक उदाहरण देऊं. इंग्लिश भाषा जो आज इतक्या थोरवीला चढली आहे, तिनें जर आपल्यांतील सर्व लाटिन ग्रीक व परदेशीय शब्द टाकून दिले, तर तिला आधीं सर्व शास्त्रीय ग्रंथ टाकून द्यावे लागतील, सर्व सुधारणेला हरताळ लावावा लागेल, आणि मग पुनः आपल्या मूळ भाषेचे सर्व नवे ग्रंथ बनवावे लागतील आणि सर्व सुधारणेचा पाया नवा उभारावा लागेल.

कित्येकांची अशी सूचना आहे कीं कानडी लोकांनीं मराठी भाषा न बोलण्याचा आणि मराठी वर्तमानपत्रें किंवा पुस्तकें न वाचण्याचा कडक नियम करावा. परंतु ही सूचना सिद्धीस जाणें अशक्य दिसतें, आणि जर कदाचित सिद्धीस गेली, तर कानडी भाषेनें आपण होऊन आपल्या पायावर धोंडा पाडून घेतल्यासारखें होईल. हें खचित समजावें. सांप्रतकाळीं मराठीभाषा ही चांगल्या प्रतिष्ठित भाषांतील एक भाषा आहे, तिची चांगली सुधारणा झाली आहे, तिजमध्यें दिवसेंदिवस नव्या नव्या लेखांचा व उत्तम उत्तम ग्रंथांचा भरणा अधिकाधिक होत आहे. अशा भाषेशीं सहजगत्या मराठी लोकांच्या सहवासानें ज्यांचा परिचय झालेला आहे किंवा होत आहे, त्यांनीं आपण होऊन त्या भाषेचें ज्ञान टाकून देणें या सारखा दुसरा वेडेपणा कोणता? त्या भाषेच्या सहज साध्य होणाऱ्या अभ्यासापासून मोठा लाभ प्राप्त करून घेतां येण्यासारखा आहे. तिजमध्यें जे चांगले चांगले विषय येतील, त्यांचें सहज ज्ञान करून घेतां येईल, स्वभाषेमध्यें भाषांतरें करतां येतील. परंतु तिजकडे पाहा याचेंच नाहीं, असा जर नेम केला, तर या सर्व सोई फुकट जातील. सूर्याचा प्रकाश फुकट मिळतो, तो घरांत न यावा ह्मणून दरवाजे खिडक्या बंद करून, आंत दिवे लावून प्रकाश उत्पन्न करण्याचा जो प्रयत्न त्या सारखाच हा प्रयत्न होईल.

चवथी सूचना अशी झाली आहे कीं कानडी ग्रंथ आणि पत्रें यांची वृद्धि करण्यासाठीं विद्वान आणि उदार गृहस्थांनीं पुढारी होऊन सभा किंवा मंडळ्या स्थापाव्या, आणि त्यांना चांगलें उत्तेजन देऊन त्यांजकडून कानडी भाषेची सुधारणा करण्याचा उद्योग चालवावा. ही सूचना फार चांगली आहे. कानडी किंवा दुसरी कोणतीही भाषा असो, तिच्या सुधारणेचें






अनुक्रमणिका

काम ती ती भाषा बोलणाऱ्या लोकांकडून जितकें चांगलें होईल तितके इतरांकडून होण्याचा वास्तविकसंभव नाहीं. राज्यकर्ते इंग्लिश लोक किंवा ख्रिस्तीधर्मोपदेशक जर्मन लोक, यांनीं कानडी भाषेच्या सुधारणेचा जितका प्रयत्न करावा तितका आपणांस अनुकूलच आहे; तथापि देशीलोकांना जर त्या भाषेचें अगत्य वाटत नसलें, तर बाह्यप्रयत्नापासूनच सर्व इष्टकार्य साध्य होणार नाहीं हें उघड आहे. दक्षिण महाराष्ट्र देशीं राजकीय व्यवहार प्रायः कानडी भाषेनेंच चालवावा असा निश्चय होऊन, आज पंचवीस तीस वर्षें त्या ठरावाप्रमाणें काम चालत आहे. तथापि अद्यापि येथील कानडी लोकांस स्वभाषेची लागावी तितकी गोडी लागत नाहीं, या गोष्टीला आमच्या मतें कांहीं कारणें झालीं आहेत. मराठीसारख्या चांगल्या भाषेशीं असलेला आपला पुष्कळ दिवसांचा परिचय एकदम सोडून द्यावा हें कित्येकांना योग्य वाटलें नाहीं, यांत आश्चर्य नाहीं. बरें, तसें करण्याला जीं योग्य साधनें पाहिजेत तींही त्यांना मिळालीं नाहींत. मराठीची लागलेली अभिरुचि सोडून देऊन, कानडीची नवी अभिरुचि उत्पन्न करायाची, तर तिचें उत्तम स्वरूप प्राप्त करून घेण्याला साधनाभाव ही मोठी अडचण झाली, असें आम्हांस वाटतें. जे मुळींच अशिक्षित लोक, त्यांना तर मराठीचाही अभ्यास नको, आणि कानडीचा ही नको. तेव्हां त्यांना विद्याभ्यासाची गोडी लावण्याला स्वतंत्र कांहीं प्रयत्न झाल्या वांचून ते स्वभाषेकडे लक्ष देतील ही आशाच व्यर्थ आहे. त्या प्रांतीं मराठीच्या जागीं कानडीची अभिरुचि उत्पन्न होण्याला काय उपाय योजला पाहिजे, या गोष्टीकडे विद्वान लोकांचें लागावें तितकें लक्ष लागलें नाहीं असें आम्हांस वाटतें. ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे, कीं म्हैसूर वगैरे प्रदेशीं कानडीच्या सुधारणेला जे उपाय योग्य वाटतील, तेच उपाय या प्रदेशीं केल्यानें सर्व कार्य होणार नाहीं. तेथील लोकांना येथल्या लोकांसारखा मराठीचा संपर्क नाहीं. त्यांचे सर्व विचार व्यवहार कानडी भाषेनेंच चालत आहेत, तेव्हां त्यांच्या भाषेमध्यें ग्रंथसंग्रह करून देणें हेंच तेथील लोकांचें मुख्य काम आहे. परंतु येथें कानडीची नवीन अभिरुचि उत्पन्न करणें हें एक मोठें काम आहे. याला जो मार्ग आम्हांला योग्य वाटतो, तो येथील कानडी विद्वान लोकांच्या मनांत अद्यापि आलेला नाहीं असें उघड दिसतें. कारण कीं जर तो उपाय त्यांच्या मनांत आला असता, तर त्यांनीं त्याच्या सिद्धीकरितां कांहींना कांहीं प्रयत्न चालविला असता. म्हणून तो उपाय जरी एथें आम्ही सांगतों, व त्यापासून जरी चांगलाच परिणाम होईल असें आम्हांस वाटतें, तरी कानडी विद्वानांचे विचार त्या संबंधानें कसे पडतील, याचा आजच आमच्यानें तर्क करवत नाहीं. आमचें म्हणणें असें आहे कीं येथील विद्वान् लोकांच्या मनांत कानडीच्या वृद्धीला मराठी भाषा आड येते, ही जी एक विलक्षण समजूत भरली आहे, ती अमळ कमी झाली पाहिजे. मराठी आणि कानडी यांचा परस्परांशीं शत्रुत्वसंबंध आहे अशी जी कित्येकांची समजूत, तीच कानडीच्या वृद्धीला आड येते असें आम्हांस वाटतें. या करितां ती समजूत आधीं दूर झाली पाहिजे. म्हणजे सर्व काम सोईनें चालेल. ज्या मराठी भाषेची अभिरुचि लोकांना अधिक आहे अशी फिर्याद आहे, तीच मराठी भाषा तुमच्या कानडीची सुधारणा करण्याच्या कामीं साधनभूत करून टाकावी म्हणजे आपोआप तुमचें काम होईल. तें कसें? तर ज्यांना कानडी आणि मराठी या दोन्ही भाषा चांगल्या





अनुक्रमणिका

अवगत आहेत असे विद्वान् बरेच आहेत त्यांनीं प्रथमतः एक कानडी भाषेचें व्याकरण शुद्ध मराठी भाषेनें लिहून प्रसिद्ध करावें. त्यामध्यें कानडी भाषा आणि व्याकरण यांचें मराठी भाषा आणि व्याकरण यांशीं कसकसें कोठेंकोठें सादृश्य आहे, आणि कसकसें कोठें कोठें भिन्नत्व आहे, हेंही उदाहरणसहित उत्तम प्रकारें स्पष्ट करावें. दुसरें कृत्य झटलें ह्मणजे एक कोश. तो असा असावा, कीं त्यामध्यें प्रत्येक मराठी शब्दाच्या स्थानीं शुद्ध कानडी शब्द कोणता योजावा व त्याचा प्रयोग कसा करावा हें समजण्याचें साधन असावें. यामध्यें जे थोडेसे संस्कृत शब्द भिन्न भिन्न अर्थानें या दोहों भाषांमध्यें योजिले जातात तितके मात्र घेऊन इतर सर्व गाळून टाकण्यास कांहीं बाध नाहीं. कारण दोहों भाषांमध्यें ते समानच आहेत. एणें करून ग्रंथविस्तार न होतां पुष्कळ काम थोडक्यांत होईल. तिसरें, सध्यां या प्रांतीं जे कित्येक अशुद्ध किंवा मिश्रित भाषाप्रकार आढळतात ते एकत्र करून त्यांच्या स्थानीं शुद्ध कानडी भाषेची योजना कशी करावी हें दाखविण्याकरितां वाक्यसंग्रहाचें एक पुस्तक करावें. हीं सर्व पुस्तकें कानडी भाषेनेंही लिहावीं, ह्मणजे ज्या कानडी लोकांना मराठी समजत नाहीं त्यांनाही आपली भाषा सुधारण्याला तें मोठें साधन होईल. इतकें करून हीं सर्व पुस्तकें सर्व शाळांमध्यें चालू करण्याकरितां विद्याखात्याचें साहाय्य मिळवावें. इतकें जर होईल, तर कानडी भाषेच्या सुधारणेला खरोखरीं आरंभ झाला असें ह्मणण्यास कांहीं बाध नाहीं. या कृत्यापासन तेथील मराठी लोकांनाही मोठा उपयोग होणार आहे. ह्मणून त्यांनींही या कामास आपणांकडून होईल तितकी मदत केली पाहिजे. त्यांच्या हिताकरितां, व जे कानडी लोक शुद्ध मराठी शिकूं इच्छितील त्यांच्याही हिताकरितां एक मराठी व्याकरण व मराठी कानडी कोश, व शुद्ध मराठीवाक्यसंग्रह यांचीं पुस्तकें त्या दोन्ही भाषांमध्यें तयार करावीं. अथवा सोईला जमेल तर एकेक पुस्तक कानडी मराठी या दोघांनाही उपयोगी होईल असें सिद्ध केल्यास फार उत्तम गोष्ट होईल.

सारांश, परस्परांचें शत्रुत्व मानिल्यामुळें आज तीस वर्षांत जें काम झालें नाहीं, तें मित्रत्वाच्या योगानें सहज पांच सात वर्षांत होऊन जाईल. आणि या दक्षिण महाराष्ट्र देशीय लोकांना धड कानडीही येत नाहीं, आणि धड मराठीही येत नाहीं अशी जो स्थिति आहे, ती निघून जाऊन, त्यांना दोन्ही भाषा चांगल्या येऊं लागतील. या शिवाय दुसरा असा एक चांगला परिणाम होईल कीं शुद्ध मराठी देशांतील आणि शुद्ध कानडी देशांतील लोकांपेक्षां यांना आपलें हित करून घेण्याचें अधिक सामर्थ्य येईल. ह्मणजे, कोणताही मराठी ग्रंथ किंवा लेख आणि कोणताही कानडी ग्रंथ किंवा लेख यांपासून आपलें ज्ञान वाढविण्याचें त्यांना साधन मिळेल. तें साधन शुद्ध मराठी किंवा शुद्ध कानडी देशांतील लोकांना मिळणाऱ्या साधनाहून श्रेष्ठ आहे असें कोणीही ह्मणू शकेल. हें काम एकदा उत्तम प्रकारें चालू झालें, ह्मणजे दुसरे आणखी अनेक चांगले चांगले ग्रंथ सहज उत्पन्न होऊं लागतील आणि त्यांपासून दिवसेंदिवस अधिकाधिक हित होत जाईल.

कानडी आणि मराठी यांचें खरें मित्रत्व होण्याला दुसरी एक मोठी अनुकूल गोष्ट आहे. ती अद्यापि तिकडील विद्वान् लोकांच्या ध्यानांत आली नसेल तर मोठेंच आश्चर्य ह्मणायाचें. मराठीभाषेच्या बालबोध आणि





अनुक्रमणिका

मोडी या दोन्ही लिपि, आणि कानडी लिपि यांची उत्पत्ति मूळच्या एकाच लिपीपासून आहे. ही गोष्ट बहुतेक कानडी लोकांना ठाऊक नाहीं; आणि त्यांना ही गोष्ट सांगितली तरी खरी वाटत नाहीं. परंतु ही गोष्ट निःसंशयपणें खरी आहे. तेव्हां लीपीच्या संबंधानें तरी मराठी आणि कानडी भाषांमध्यें सहोदर संबंध असल्यामुळें परस्पर स्नेहाला तितकें विशेष कारण आहे. ही गोष्ट त्या प्रांतांतील सर्व विद्वान् लोक लक्षांत आणतील तर बरें होईल. असो. याविषयाच्यासंबंधानें विशेष लिहिण्यापूर्वी त्या प्रांतांतील विद्वान् लोकांचें या विषयीं काय मत आहे तें समजणें अवश्य आहे. ह्मणून तूर्त हा विषय इतकाच ठेवितों, व त्या विद्वान् लोकांनीं याचा पूर्ण विचार करावा अशी त्यांस आदरपूर्वक सूचना करितों.

कानडी आणि मराठी लिपींचा सहोदर-संबंध कसा काय आहे, हा आह्मी थोडक्याच दिवसांत उत्तम प्रकारें स्पष्ट करून दाखविण्याची उमेद धरीत आहों.

हा जो कानडी भाषेच्या संबंधानें आह्मी लेख लिहिला आहे यापासून जर खरोखरी कांहीं उपयोग झालेला दृष्टीस पडेल, तर मराठी-हिंदुस्थानी आणि मराठी–गुजराथी इत्यादि भाषांनांही हे विचार कितपत लागू पडतील हें पाहण्याचा प्रयत्न करण्यास आह्मांस उत्तेजन येईल.



# कविचरित्र.

## मंखक.

### इ. स. ११२०–११७० सुमारें

वृत्त – हा संस्कृत कवि काश्मीर देशांत होऊन गेला. त्या देशांत सतीसर ह्मणून एक मंडल ( प्रांत ) होतें. त्यांत प्रवरपुर ह्मणून नगर होतें. ह्यालाच हल्लीं श्रीनगर ह्मणतात. ह्या प्रवरपुरांत मन्मथ या नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण होता. त्याला विश्ववर्त्त ह्मणून एक पुत्र झाला. ह्या विश्ववर्त्ताला शृंगार, भृंग, अलंकार ऊर्फ लंकक, आणि मंखक असे क्रमानें चार पुत्र झाले. ही सर्व हकीकत मंखक यानें स्वकृत काव्यांत दिली आहे ती अशीः—

कुबेरसख्या: ककुभो ललाटिका
यदेति कश्मीरपदाभिधेयताम् ।
सतीसरो नाम तदस्ति मंडलं
विचित्रसर्गावभृथः प्रजापतेः ॥ १ ॥
गुणैर्मयूखैरिव शुद्धिमत्तरै –
र्निकाममुत्तंसितसर्वदिङ्मुखम् ।
धृतप्रसिद्धि प्रवराख्यया पुरं
विगाहते यस्य किरीटरत्नताम् ॥ २१ ॥
स मन्मथो नाम जगाम तद्द्विव
प्रथां प्रसन्नेश्वरदृष्टि भाजनम् ।
न मार्गणानां सुमनोमयात्मनां
मनागपि क्षेपकलासु शिक्षित: ॥ ३१ ॥
धदान्यमास्त्यानबृहत्कपारस-
प्रवाहशंकाजननैक दक्षिणम् ।
स्वसूक्तिकीर्तिप्रसरैरनश्वरं
स विश्ववर्ताख्यमवाप नंदनम् ॥ ३९ ॥
पुरः स शृंगारमुदारचेष्टितं
सुतं प्रपेदे पदमेकमुन्नतेः ।
मुखेन यः सत्यसरस्वतीमय-




अनुक्रमणिका

श्रिणाऽर्धनारीश्वरतामिवाग्रहीत् ॥ ४५ ॥
स भृंग इत्यस्य गतोऽनुजन्मतां
दधत् स्वनाम्नोऽनुगुणामपि श्रियम् ।
अपक्षतित्वे पदमुन्नतोन्नतं
विगाहमानो दिशति स्म विस्मयम् ॥५३॥
ततः कनीयानजनिष्ट विष्टप-
त्रयेऽप्यविच्छिन्नगतागतैर्गुणैः ।
श्रयन्नलंकार इति प्ररूढतां
सरस्वतीपादरजोऽतिथौ पथि ॥ ५६ ॥
अथोदभूत् तस्य कनिष्ठसोदरः
स मंखको यस्य शिशोरतन्वत ।
शिरस्युपोढा गुरुपादरेणवः
सरस्वतीकार्मणचूर्णनैपुणम् ॥ ६३ ॥

सर्ग ३.

पुढील साहाव्या सर्गातील पद्यांत कर्णिकार फुलाचा रंग मात्र उत्तम आहे, परंतु त्याला वास मुळींच नाहीं असें मंख कवीनें मोठ्या खुबीनें वर्णिल्यामुळें त्याला कर्णिकार मंख असें नांव मिळालें आहे:—

विभ्रण्वता सौरभरोरदोषं बंदित्रतं वर्णगुणैः स्पृशंत्याः। विकस्वरे कस्य न कर्णिकारे घ्राणेन दृष्टेर्वृधे विवादः ॥ १३ ॥

या प्रमाणेंच दीपशिखा कालिदास, छत्र भारवि, घंटामाघ, तालरत्नाकर, यमुनात्रिविक्रम इत्यादि उपपदयुक्त नांवें कवींना मिळालेलीं आहेत.

कालनिर्णय—काश्मीरचा राजा जयसिंह ह्याच्या पदरीं ह्याचा वडील भाऊ अलंकार हा होता. हा जयसिंह इ. स. ११२७ पासून ११४९ पर्यंत काश्मीरचे गादीवर होता. या वेळीं त्या देशांत दुसरे विद्वानही पुष्कळ होते. कल्हण पंडितानें राजतरंगिणी नांवाचा काश्मीरचा इतिहास ह्या जयसिंहाच्या कारकीर्दींतच शा. श. १०७० ह्मणजे इ. स. ११४८ त केला. यावरून हा मंखक कवि इ. स. च्या बाराव्या शतकांत होता ही गोष्ट उघड आहे. जयसिंहाचा आश्रय आपल्या वडील बंधूला होता ही गोष्ट मंखकानें पुढील पद्यांत लिहिली आहे:—

अनंतरं सुस्सलदेवनंदनो
यमादराच्छ्रीजयसिंहभूपतिः ।
व्यधात् प्रजापालनकार्यपूरुषं.
रुषं वितन्वन्नविनीतजंतुषु ॥ ६६ ॥

सर्ग ३.

ग्रंथ—श्रीकंठचरित यानांवाचें २५ सर्गाचें एक महाकाव्य यानें रचिलें आहे, तें छापून प्रसिद्ध झालें आहे. ह्या काव्याच्या शेवटच्या सर्गांत आपला गुरु रुय्यक होता असें पुढील पद्यांत त्यानें सांगितलें आहे:—

तं श्रीरुय्यकमालोक्य स प्रियं गुरुमग्रहीत् ।
सौहार्दप्रश्रयरसस्रोतःसंभेदमज्जनम् ॥ ३० ॥

सर्ग २५.

आपल्या गुरूखेरीज ब्रह्मवादी नंदन, वेदांती रम्यदेव, षड्भाषाभिज्ञ लोष्टदेव, श्रौती श्रीगर्भ, त्याचा पुत्र चतुर्दशविद्याभिज्ञ मंडन, मंडनाचा धाकटा भाऊ सकलविद्यापारंगत श्रीकंठ, कविश्रेष्ठ गर्ग, मंदिरशास्त्रज्ञ श्रीदेवधर, साहित्यशास्त्रज्ञ नाग, तार्किक, कवि, व केवल प्रतिकुमारिल असा श्रीत्रैलोक्य, दामोदर, पंडितश्रेष्ठ षष्ठ, कवि जिंदुक, सोमपालविलासकाव्यकर्ता जल्हण, गोविंद, अलकदत्त, कथाकोविद कल्याण, भुड्ड, श्रीवत्स, तार्किक श्र्यानंद, गुन्न, कवि पद्मराज, सोमयाजी लक्ष्मीदेव, याजक जनकराज, आगमशास्त्रज्ञ प्रकट, शंभुमहाकवीचा पुत्र वैद्यश्रेष्ठ आनंद, त्याचा धाकटा भाऊ वैद्य सुहल, कान्यकुब्ज देशाचा राजा गोविंदचंद्र याचा दूत वैयाकरण सुहल, उपाध्याय जोगराज, शूर्पारक ऊर्फ कोंकण देशचा राजा अपरादित्य याचा दूत वादिश्रेष्ठ तेजकंठ, महाकवि वागीश्वर, व विद्वच्छ्रेष्ठ पटु इतक्या ह्मणजे ३२



स्वकालीन पंडितांचा आणि कादंबरीकर्ता बाण, अभिनवगुप्त, भट्ट, प्रभाकर, अनर्घराघवनाटककर्ता मुरारि, कर्पूरमंजरी सट्टकादिकांचा कर्ता राजशेखर, विक्रमांकदेवचरितमहाकाव्यकर्ता बिल्हण या पूर्वीच्या पंडितांचा उल्लेख मंखक कवीनें स्वकृत महाकाव्याच्या शेवटच्या सर्गांत केला आहे. तसाच हयग्रीववध महाकाव्यकर्ता मेंठ, वासवदत्ताकर्ता सुबंधु, किरातार्जुनीय महाकाव्यकार भारवि, व बाण यांचा उल्लेख दुसऱ्या सर्गाच्या पुढील श्लोकांत त्यानें केला आहे:—

मेंठे स्वर्द्विरदाधिरोहिणि वशं याते सुबंधौ विधेः
शांते हंत च भारवौ विघटिते बाणे विषादस्पृशः।
वाग्देव्या विरमंतु मंतुविधुरा द्रागूद्दृष्टयश्चेष्टते
शिष्टः कश्चन स प्रसादयति तां यद्वाणि सद्वाणिनी
॥ ५३ ॥

हें काव्य आपल्या बापानें स्वप्नांत येऊन रचण्याविषयीं सांगितल्यामुळें मी रचिलें असें पुढील पद्यांत त्यानें म्हटलें आहे:—

द्वैराज्यकारि सुमनोनिवहस्य कर्ण–
पूरश्रियः कमपि वाङ्मयमध्यगीष्ठाः।
तत् किं पुनासि न सुत क्षणदाकुटुंब–
लेखावचूलचटुयुक्तिभिरुक्तिदेवीम् ॥७५॥
पितृभारतीविवृत पौष्टिकाक्रिया
क्रममाणभक्ति सहवासिमानसः।
इति स प्रबंधयति मंखको
गिरं विरचय्य शंकरचरित्रकिंकरीम् ॥७८
सर्ग।३

पितुर्बिभ्राणस्य स्मररिपुपुरीपौरपदवीं नि-
योगेन स्वप्ने पदमुपगनेन श्रवणयोः।
प्रबंधं संधायेत्यधिकविबुधश्लाघ्यनिरघक्रमं
मंखः सौख्यं किमपि हृदये कंदलय
ति ॥ १५२ ॥ सर्ग २५

हें श्रीकंठचरित्र महाकाव्य उत्तम आहे. तरी कालिदासाच्या रघुवंशमहाकाव्या इतकी याची भाषा सरळ नाहीं. या काव्याखेरीज या मंखक कवीनें मंखकोष म्हणून एक शब्दकोष केला आहे.

---

## गोवर्धनाचार्य.

### (इ. स. १०७५–११२५ सुमारें)

वृत्त— वंग म्हणजे बंगालदेश याचा कायस्थकुलोद्भूत राजा बल्लाळसेन याचा पुत्र लक्ष्मणसेन याचे पदरीं हा कवि होता. लक्ष्मणसेन राजाच्या दरबारीं पुढील पद्यांत सांगितलेले कवि होते:—

गोवर्धनश्च शरणो जयदेव उमापतिः।
कविराजश्च रत्नानि समितौ लक्ष्मणस्य च॥

यावरून गोवर्धनाचार्य ह्याचे समकालीन शरण, जयदेव, उमापति व कविराज हे कवि होते असें उघड होतें. ह्याच्या बापाचें नांव नीलांबर असें होतें, असें पुढील आर्येवरून दिसतें—

यं गणयंति गुरोरनु यस्याऽऽस्ते धर्म कर्म संकुचितम्।
कविमहमुशनसमिव तं तातं नीलांबरं वंदे ॥
॥ ३ ॥

यानें आपल्या यजमानाच्या व आप[illegible] नांवाचा उल्लेख पुढील आर्येत केला आहे:—

सकलकलाः कल्पयितुं प्रभुः प्रबंधस्य [illegible]दबंधोश्च।
सेनकुलतिलकभूपतिरेको राकाप्रदोषश्च ॥ ३९ ॥
मसृण पदरीतिगतयः सज्जनहृदयाभिसारिकाः सुरसाः।
मदनाद्वयोपनिषदो विशदा गोवर्धनस्यार्याः
॥ ५१ ॥




अनुक्रमणिका

हरिचरणांजलिममलं कविवरहर्षाय बुद्धिमान् सततं ।
अकृतार्या सप्तशतीमितां गोवर्धनाचार्यः ॥ ७०२

आपला शिष्य उदयन व सहोदर बलभद्र यांच्या नांवांचा उल्लेख गोवर्धनानें पुढील आर्येंत केला आहे.

उदयनबलभद्राभ्यां सप्तशती शिष्यसोदराभ्यां मे
द्यौरिव रविचंद्राभ्यां प्रकाशिता निर्मलीकृत्य ॥ ७०१ ॥

वाल्मीकि, व्यास, गुणाढ्य, कालिदास, बाण, भवभूति ह्या आपणांपूर्वी होऊन गेलेल्या कवींचा उल्लेख गोवर्धनानें पुढील आर्यांत केला आहेः—

विहितघनालंकारं विचित्रवर्णावलीमयस्फुरणम्।
शक्रायुधमिव वक्रं वल्मीकिभुवं कविं नौमि॥३०
अतिदीर्घजीविदोषाद् व्यासेन यशो पहारितं हंत।
कैर्नोच्यते गुणाढ्यः स एव जन्मांतरापन्नः॥३३
साकूतमधुरकोमलविलासिनीकंठकूजितप्राये ।
शिक्षासमयेपि मुदे रतलीला कालिदासोक्ती॥३५
भवभूतेः संबंधाद् भूधरभूरेव भारती भाति ।
एतत्कृतकारुण्ये किमन्यथा रोदिति ग्रावा ॥३६॥
जाता शिखंडिनी प्राग् यथा शिखंडी तथाऽवगच्छामि ।
प्रागल्भ्यमधिकमाप्तुं बाणी बाणो बभूवेति ॥३७॥
पूर्वैर्विभिन्नवृत्तां गुणाढ्यभवभूतिबाणरघुकारैः।
वाग्देवीं भजतो मम संतः पश्यंतु को दोषः॥
॥ ६९७ ॥

जयदेव कवीनें गीतगोविंदांत या गोवर्धनाची पुढें लिहिल्याप्रमाणें स्तुति केली आहेः—

शृंगारोत्तरसत्प्रमेयरचनैराचार्यगोवर्धनः-
स्पर्धी कोपि न विश्रुतः ॥

काल निर्णय—कालिदास, बाण, व भवभूति यांचेनंतर हा कवि झाला हें वरील आर्यांवरून उघड होतें. तसेंच गीतगोविंदकर्ता जयदेव याचा समकालीन किंवा याच्या किंचित् पूर्वींचा हा कवि होता असेंही वरील पद्यावरून होतें. इ. स. च्या ११ व्या शतकाच्या समाप्ती पर्यंत लक्ष्मणसेन वंगदेशांत राज्य करीत होता असें इतिहासज्ञांचें मत आहे. यावरून त्याच्या दरबारीं असणारा हा गोवर्धन कविही अकराव्या शतकांत होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

ग्रंथ—आर्यासप्तशती या नांवाचा याचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथांत एकंदर ७५६ आर्या आहेत. गीतगोविंदकर्ता जयदेव यानें वरील स्तुत पद्यांत लिहिल्या प्रमाणें या आर्यासप्तशती ग्रंथांत शृंगाररसाचे द्रोणचे द्रोण भरलेले आहेत. ज्या संस्कृताभिज्ञ तरुण पुरुषांस आपली इच्छा तृप्त करून घेणें असेल, त्यांस ढेंकर येईपर्यंत प्रथमरसपान यांत प्राप्त होईल, असें आह्मी खातरीनें सांगतों. या ग्रंथांतील ७५६ आर्यांपैकीं पहिल्या ५४ त उपोद्घात आहे व शेवटच्या सहांत ग्रंथोपसंहार आहे.

---

## योग्य स्थानीं योग्य मनुष्याची नेमणूक.

"**बॉम्बे हायकोर्ट**" या नांवाची जी एथील **वरिष्ठ न्यायसभा** तिजमधील एका न्यायासनावर **महाराणी सरकाराकडून** नामदार **काशीनाथ त्रिंबक तेलंग** यांची नेमणूक झाल्याची सुवार्ता प्रसिद्ध झालीच आहे. या सुवार्तेच्या संबंधानें नामदार साहेबांना अभिनंदनरूप चार शब्द या पुस्तकांत लिहिणें हें आमचें अत्यंत प्रिय कर्तव्य होय. रा॰रा॰काशीनाथपंत तेलंग यांची जी ही महाराणी सरकारांनीं नेमणूक केली, ती खरो-








अनुक्रमणिका

खरी अत्यंत पोक्त विचारानें केली, यांत कांहीं संशय नाहीं. ही नेमणूक फार उत्तम झाली, असें या इलाख्यांतील सर्व मराठी, गुजराथी, कानडी, आणि इंग्रजी वृत्तकारांनीं आपापले योग्य अभिप्राय दिले आहेत.

रा० रा० काशीनाथपंत यांचें जन्म या मुंबई शहरामध्येंच सन १८५० इस्वीच्या ऑगस्ट महिन्यांत झालें. मुंबईतील पुरातन संभावित व बऱ्याच श्रीमंतीनें चालत आलेल्या घराण्यांपैकीं यांचें घराणें आहे. पोर्तुगीस लोकांनीं जेव्हां मुंबई घेतली, तेव्हां त्या वेळच्या राजकीय संबंधामुळें गोमंतकाकडून जे कित्येक सारस्वत गौड ब्राह्मण कारकुनी काम पत्करून मुंबईस आले, त्यांत यांचे पूर्वज होते. यांचें उपनांव 'तेलंग'. 'तेलंग' हें गांवाचें नांव आहे. सांप्रत गोव्यांमध्यें 'वेलंग' किंवा 'वेलिंग' ह्मणून जो गांव आहे, तोच 'तेलंग' असें ह्मणतात; कोणी ह्मणतात कीं वेलंगाच्या जवळच 'तेलंग' हा गांव होता. परंतु याविषयीं निश्चयात्मक रीतीनें सांगण्यास आजच आमच्या पाशीं साधन नाहीं, तथापि या उपनांवाचा तेलंगणाशीं कांहीं संबंध नाहीं, हें उघड आहे. 'तेलंग' उपनांवाचे यांचेसगोत्र गृहस्थ गोमांतक, कानडा आणि दक्षिण महाराष्ट्र देश येथें पुष्कळ आहेत. असो. यांचे आजे रामचंद्रराव तेलंग यांस चार पुत्र; त्यांत रा० त्रिंबकराव आणि रा० बापूराव, हे हयात आहेत. त्रिंबकराव यांस औरस अपत्य नाहीं. बापूराव यांस दोन पुत्र; वडील कृष्णरावबापू, आणि दुसरे हे काशीनाथपंत. त्रिंबकराव यांनीं काशीनाथ यास दत्तक घेतल्यामुळें, हे काशीनाथ त्रिंबक झाले. यांचें एकंदर इतिवृत्त एथें लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं; तथापि इतकें सांगणें अवश्य आहे कीं यांना लहानपणापासून घरची शिक्षा उत्तम प्रकारची असे. यांची जन्मदात्री माता येथील प्रसिद्ध 'दळवी' यांच्या घराण्यांतील कन्या; आणि पोषणकर्ती माता प्रसिद्ध 'वागळे' यांच्या घरची कन्या; यामुळें यांच्या शिक्षणाला तितकी विशेष मदत झाली. ज्यात्या हे बुद्धिमान् असल्यामुळें, नवव्या वर्षींच एथील 'एल्फिन्स्टन् इन्स्टियूशन्' विद्यालयांत यांचा प्रवेश झाला. सन १८६३ च्या जून महिन्या मध्यें यांच्याशीं आमचा प्रथम परिचय त्या वेळीं हे रा. रा. नारायण महादेव परमानंद या उत्तम विद्वान आणि सौम्य शिक्षकाच्या हाताखालीं पहिल्या वर्गांत होते. तेथें यांच्या अभ्यासाच्या उत्तम शैलीवरून, तसेंच यांच्या गोड आणि चंचल वर्तनावरून, आणि यांच्या खेळकर मनोरम आणि सुहास्ययुक्त संभाषणावरून यांच्या अंगचें तेज त्या वेळींच उत्तम प्रकारें झळकत असे. मूर्ति जरी लहान, तरी वर्गांतील अभ्यास, तसेंच खेळणें, बोलणें, थट्टा, विनोद, इत्यादि सर्व गोष्टींमध्यें काशीनाथ जें कांहीं ह्मणेल तें प्रायः सर्व सहाध्यायी जनांला ग्राह्य असे. या सर्व गोष्टींवरून हा विद्यार्थी खरोखरी पुढें कोणत्या तरी मोठ्या पदवीस चढणारा मनुष्य निपजेल असें स्पष्ट दिसत असे. पुढें रा.रा.परमानंद हे शाळेंतील शिक्षकीचें काम सोडून 'नेटिव ओपिनियन' पत्राचे कर्ते झाल्यामुळें त्यांच्या जागीं रा. रा. जनार्दन विनायक वापट हे दुसरे विद्वान गृहस्थ आले. त्यांच्याही हाताखालीं असतां, व पुढें मिस्टर एडमंड बर्क आणि मिस्टर. जेफरसन हे शाळेचे प्रिन्सिपाल यांच्या हाताखालीं 'म्याट्रिक्युलेशन्' परिक्षेच्या अभ्यासासाठीं नेमिलेल्या 'क्यांडिडेट्' वर्गामध्येंही यांची प्रवीणता फार दिसून येत असे. १८६४




अनुक्रमणिका

च्या अखेरीस हे म्याट्रिक्युलेशन परीक्षेंत उतरले. त्यावर्षी कांशीनाथपंत हे, आणि स्वर्गवासी श्रीपादबाबाजी ठाकूर हे, असे दोघेच काय ते संस्कृत भाषेंत परीक्षेस बसले होते. या पूर्वी विश्वविद्यालयांतील म्याट्रिक्युलेशन ह्मणजे प्रवेशपरीक्षेला संस्कृत भाषा कोणीही घेतली नव्हती. पुढें एल्फिन्स्टन् कॉलेजामध्यें असतां प्रोफेसर ह्यूलिंग्झ्, ऑक्सनूहम्, बुलर आणि क्यांडि, यांची यांवर बहाल मर्जी होतो. त्या वेळेच्या त्यांच्या सहाध्यायी मंडळीमध्यें पुढें प्रख्यातीस आलेले बरेच विद्यार्थी होते. श्रीपाद बाबाजी ठाकूर, अंबालाल साकरलाल देसाई, जमशेटजी अर्देसर वाछा, घनश्याम नीलकंठ नाडकर्णी, गजानन कृष्ण भाटवडेकर, रावजी वासुदेव टुलु, हे सर्व एका वर्गात असून, यांची फार प्रशंसा असे. सध्यांचे विद्याखात्याचे मुख्य अधिकारी चाटफील्ड् साहेब हे एल्फिन्स्टन् कालेजाचे प्रिन्सिपाल होऊन विलायतेहून आले, त्यांची काशीनाथपंतांवर फार प्रीति असे. पुढें काशीनाथपंत यांच्या परीक्षा एकी पुढें एक क्रमानें उतरत गेल्या. त्यांनीं कायद्यांचाही अभ्यास चालवून त्यामध्यें ही उत्तम यश मिळविलें. भगवानदास संस्कृत 'स्कॉलर्शिप्' यांनीं मिळविली, एल्फिन्स्टन् हायस्कूलामध्यें संस्कृत भाषेचे शिक्षक झाले, एल्फिन्स्टन् कॉलेजामध्यें 'सीनियर फेलो' ची पदवी मिळविली, आणि एथील हायकोर्टांतील 'अडव्होकेटची' परीक्षा देऊन 'बारिस्टर' चें काम चालवूं लागले. या सर्व कामीं त्यांना उत्तम यश मिळत चाललें. बारिस्टरच्या कामीं यांची फार प्रशंसा झाली. सरकारानें 'एज्युकेशन कमिशन्' या नांवें विद्याखात्याच्या संबंधानें शोध चालविण्याकरितां, जी मोठमोठ्या विद्वानांची मंडळी नेमिली होती, तिजमध्यें यांची नेमणूक झाली, आणि तें काम फार उत्तम प्रकारें चालविल्याबद्दल सरकारानें यांचे फार आभार मानिले. कलकत्ता एथें गव्हर्नर जनरल साहेबांनें 'लेजिस्लेटिव्ह कौन्सिल्' ह्मणजे कायदे करणाऱ्या मंडळीची सभा, इजमध्यें नेमणूक केल्यास तुह्मी स्वीकाराल काय, असें यांना विचारिलें होतें. परंतु तें काम यांनीं आपल्या कामाच्या अडचणीमुळें पतकरण्याचें नाकारल्यावरून, त्यांना मग एथीलच गव्हर्नर साहेबांच्या कायदेमंडळींत सभासद नेमिलें. हल्लीं, कांहीं महिन्यांमागें येथील हायकोर्टांतील न्यायासनीं असणारे विद्वान् गृहस्थ नानाभाई हरिदास हे स्वर्गस्थ झाल्यामुळें त्यांची जागा रिकामी झाली, त्या जागीं नामदार तेलंग साहेब यांची उत्तम नेमणूक झाली आहे.

नामदार तेलंग साहेब यांस मराठी, गुजराथी, संस्कृत, या भाषांचें तर ज्ञान फार उत्तम आहेच, पण हिंदुधर्मशास्त्राच्या संबंधानें त्यांची फार प्रशंसा आहे. इंग्लिश भाषेमध्यें तर त्यांची गति वर्णनीय आहे. वक्तृत्वशक्ति इतकी निर्दोष, गोड, समयोचित आणि चित्तहारक आहे कीं, मागें एके प्रसंगीं यांना या गुणावरून येथील इंग्लिश पत्रकर्त्यांनीं प्रख्यात रोमन वक्ता 'सिसरो' याची योग्यउपमा दिली होती. याना जर्मन आणि ल्याटिन भाषाही येतात. प्राचीन ताम्रपट्ट, शिलालेख इत्यादिकांचा अर्थ लावून अनेक ऐतिहासिक गोष्टींचे यांनीं उत्तम शोध लाविले आहेत. यांनीं बरेंच इंग्लिश, मराठी उत्तम ग्रंथ केले आहेत व कित्येक संस्कृत ग्रंथ उत्तम प्रकारें शोधून छापविलें आहेत. यांना पाश्चात्य विद्यांचा उत्तम संस्कार असून, हे 'हिंदु' या नांवाचे व हिंदुधर्माचे पूर्ण अभिमानी व कैवारी आहेत. यांचें वर्तन इतकें निर्मळ आणि निर्दोष आहे कीं कोणत्याही प्रकारें यांना कोणीही



अनुक्रमणिका

नांव ठेवूं शकणार नाहीं. श्रीमद्भगवद्गीता, आणि श्रीमद्वाल्मीकिरामायण हे आमचे पूज्य ग्रंथ पाहून, त्यांच्याविषयीं कित्येक मोठमोठ्या युरोपियन पंडितांनीं भलभलते कुतर्क केले होते; आणि ते ग्रंथ ख्रिस्ती बैबलाच्या, आणि ग्रीकभाषीय 'इलियड्' नामक पाश्चात्य पुराणाच्या आधारानें रचलेले आहेत, इत्यादि वेडगळ आरोप आणून मोठाच बाऊ केला होता; पण तेलंगसाहेबांनीं आपल्या दीर्घ शोधकतेच्या आणि अप्रतिम विद्वत्तेच्या साधनानें त्या आरोपांचें असें कांहीं समर्पक खंडन करून टाकिलें, कीं त्या वेळेपासून असल्या वेडगळ कल्पना काढणारांचीं तोंडें अगदीं बंद होऊन गेलीं. आणि प्रत्येक हिंदूच्या तर काय, पण प्रत्येक युरोपियन आणि अमेरिकन विद्वानाच्याही मनामध्यें या थोर गृहस्थाच्या योग्यते विषयीं पूज्य बुद्धि उत्पन्न झाली.

नामदार तेलंगसाहेब हे एथील विद्यावृद्धीसंबंधीं, आणि लौकिक सुधारणांसंबंधीं प्रायः हरएक संस्थेमध्यें पुढारी असतात. यांच्या अंगीं दीर्घ विचारशीलता, पूर्णसभ्यता, आणि वक्तृत्वमधुरता इत्यादि गुण पूर्णपणें वास करीत आहेत, यामुळें यांनीं आरंभिलेल्या कृत्याला बहुशः सर्व समजूतदार लोकांची संमति असते.

नामदार तेलंग साहेब हे लहानपणीं मराठी शाळेंत शिकत असत, तेव्हांपासूनत्यांचें सुलक्षण पाहून नामदार विश्वनाथ नारायण मंडलिक हे त्यांची फार तारीफ करीत, व त्यांची दिवसेंदिवस वढती पाहून त्यांना फार आनंद होई, आणि आज जर मंडलिक साहेब जिवंत असते, तर तेलंग साहेबांना हो वरिष्ठ न्यायाधिशीची जागा मिळालेली पाहून त्यांना अत्यानंद झाला असता. असो.

देशी लोकांना इंग्रजी राज्यामध्यें मिळण्याजोगे जे अधिकार, त्या सर्वांत हा अधिकार मोठा आहे. हा अधिकार तेलंग साहेबांना अत्यल्प वयामध्यें ह्मणजे त्यांच्या वयाच्या ३९ व्या वर्षी मिळाला आहे, हें त्यांना व त्यांच्या सर्व देशबांधवांना मोठें भूषण होय. या अधिकारावर दीर्घकाल पर्यंत नामदार तेलंग साहेब यांनीं सुखानें राहून देशाचें हित करावें, यांच्या हातून आणखी अनेक चांगलीं चांगलीं कृत्यें घडून यावीं, आणि दिवसेंदिवस यांची आबरू वाढत जावी, हेंच परमेश्वरापाशीं आमचें मागणें आहे.

---

## पत्र.

**( " नेटिव ओपिनियन" मधील ' लिहून मजकूर पाठविणारे ' गृहस्थ व राजाराम रामकृष्ण भागवत. )**

चालू सालाच्या **नेटिव ओपिनियनच्या आगस्ट** महिन्याच्या शेवटच्या अंकांत व **सप्टेंबर** महिन्याच्या पहिल्या तीन (पहिल्या, पांचव्या, व आठव्या तारखेच्या) अंकांत माझे "शिवछत्रपतीचें चरित्र" व "रत्नाकरपंतांचें चरित्र" यांच्या संबंधानें ह्मणून जो पत्रव्यवहार आला आहे त्याचा जबाब मी आपणांकडेस पाठवीत आहें. तर तो लौकरच छापून प्रसिद्ध करण्याची कृपा कराल, अशी आशा बाळगतों.

आजपर्यंत ज्या आमच्या देशी भाषेंत बखरा छापल्या गेल्या आहेत, त्यांचे दोन वर्ग केले पाहिजेत. तत्तत्कालीन पुरुषांनीं केलेल्या बखरांचा पहिला वर्ग व भाकड कथा प्रचलित होत्या त्या घेऊन त्यांत स्वकृत [illegible] मीठ मिसळून केलेल्या बखरांचा दुसरा वर्ग, असे दोन वर्ग केल्याशिवाय गति नाहीं. **सभासदकृत**





अनुक्रमणिका

**शिवछत्रपतींचें** चरित्र पहिल्या वर्गांतील असून आपल्याच मासिकांत छापलेलें चिटणीसकृत सप्तप्रकरणात्मक चरित्र दुसऱ्या वर्गांतील होय. **काव्येतिहाससंग्रहांतील भाऊसाहेबांची** बखर पहिल्या वर्गांतील व **पेशव्यांची** बखर दुसऱ्या वर्गांतील समजावी. पहिल्या वर्गांतल्या बखरांमधील इतिवृत्त तत्तत्कालीन पुरुषांनीं दिलेलें असल्यामुळें तें विशेष विश्वास्य व यथार्थ समजलें पाहिजे. दुसऱ्या वर्गांतील बखरांत इतिवृत्त असतें, तें प्रायः भाकड कथांनीं व अनेक हेतुविशिष्ट अतिशयोक्तींनीं भरलेलें असतें; ह्मणून असल्या बखरांवर फारसा विश्वास ठेवणें व त्यांतील इतिवृत्त यथार्थ समजणें रास्त नाहीं. पहिल्या वर्गास भूतार्थ बखरांचा वर्ग व दुसऱ्या वर्गास भाकड बखरांचा वर्ग, अशीं नांवें देऊं. अशा प्रकारच्या दोन वर्गांचें समर्थन कोणास हवें असल्यास पुनः प्रसंगीं करून, आपणांसच तसदी देण्याचा विचार आहे.

तेव्हां **शिवछत्रपतींचें** चरित्र कोणासही लिहिणें असल्यास आमच्या देशी भाषेंतील मुख्य आधार **सभासदकृत** चरित्र होय. दुसरा आधार अजून पर्यंत पुरा छापलेला तरी नाहीं. जेथें भूतार्थ बखरांतील इतिवृत्ताशीं विरोध येत नाहीं, तेथें भाकड बखरांतील इतिवृत्ताचें प्रामाण्य स्वीकारणें इष्ट होणार नाहीं. भाकड बखरा देखील जितक्या छापून बाहेर निघतील, तितक्या इष्टच आहेत. पण भूतार्थ बखरांची मातबरी विशिष्ट आहे, तशी भाकड बखरांची नाहीं. मऱ्हाठ्यांच्या संबंधानें जी **सभासदां**च्या बखरेंत माहिता दिलेली असते व ज्या गोष्टी किंवा इतिवृत्त त्यांनीं दाखल केलेलें असतें, तें सर्व भूतार्थ व वस्तुवृत्त होय. तरी [illegible]ळी माहिती सभासदांकडून किंवा दुसऱ्या कोणत्याही जुनी बखर करणाऱ्या मऱ्हाठ्याकडून मिळण्याचा संभव नाहीं; कारण **महाराष्ट्र**मंडळांतल्या या काळच्या मोठ्या घडामोडीच्या नाटकांत **दिल्ली**पति हें एक मुख्य पात्र होतें. हें पात्र अविंध होतें, त्या पक्षीं अविंधांकडील कच्ची व तपशीलवार हकीकत अविंधांकडून किंवा अविंधांच्या पदरच्या एखाद्या हिंदूकडूनच मिळण्याचा संभव विशेष आहे. **अवरंगझेबा**चे कारकीर्दींत **दलपत बुंदेले** ह्मणून एक सरदार होता, तो त्याच्या बरोबरच **दक्षिणें**तील नांवाजलेल्या मोहिमेंत होता. या **दलपत**च्या पदरीं एक **रजपूत** होता, त्यानें या मोहिमेची व **शिवाजी** पासून तों मोहिमेपर्यंतची हकीकत **फारसींत** लिहून ठेविलेली आहे. या हकीकतीचें इंग्रजी भाषांतर झालें आहे. या हकीकतीस "**बुंदेल्याची हकीकत**" असें पूर्वीं एके प्रसंगीं ह्मणण्यांत आलें आहे. **मोंगलां**कडील कच्चें व तपशीलवार त्या काळचें इतिवृत्त व मऱ्हाठ्यांकडील **सभासदां**कडून समजत नाहीं असलें इतिवृत्त, हीं दोन्ही समजण्यास ही हकीकत एक मोठें साधन आहे. दुसरीं अविंधी साधनें निःसंशय असतील. पण तीं उपलब्ध दिसत नाहींत.

शिवाजीच्या पूर्वींचा **गुलामशाही** स्थापन झाल्यापासूनचा **महाराष्ट्रमंडळा**चा इतिहास अविंधांच्या दृष्टीनें समजण्यास **फिरिस्ता** नांवाचा इतिहासकार बराच उपयोगीं पडतो. या इतिहासकारास **इब्राहिम अदिलशाहाचा** आश्रय होता. याचा इतिहास इसवी सन १५९६ पर्यंत आहे. याचीं **इंग्रजी** दोन भाषांतरें आहेत.

**इंग्रज, फिरंगी** वगैरे पाश्चात्य लोकांचाच संबंध येतो, असलें इतिवृत्त **ऑर्मच्या** "त्रुटित हकीकती" वरून बरेंच कळतें. पाश्चात्य लोकांचा आमच्या देशाशीं थोडा बहुत संबंध **शिवाजी**चे काळीं अनेक कारणांनीं जडलेला होता. **ऑर्म**ची हकीकत **संभाजीच्या** क्रूर वधापर्यंत आली आहे. ही हकीकत **इंग्रजानें**





अनुक्रमणिका

लिहिलेली असल्यामुळें मुळचीच **इंग्रजींत** आहे-

**ग्रांट डफनें** जी बखर केली आहे, ती पुष्कळ अंशीं विश्वास्य आहे. जेथें भूतार्थ बखरांबरोबर विरोध येईल, तेथें तिची मातबरी बिलकुल नाहीं. भाकड बखरांबरोबर कितीही विरोध आला, तरी तितक्यावरून या बखरीचा संकोच करणें रास्त नाहीं. **ग्रांट डफनें चिटणिसांच्या** बखरेच्या संबंधानें I do nothink he has made a good use of the valuable letters and records in his possession असा शेरा मारला आहे, तो यथायोग्य दिसतो. हो बखरही इंग्रजींतच आहे.

माझे सगळे आधार इतक्यांत आटपतात. मी **मेकालेचें** अध्ययन केलेलें नाहीं व **हालामचें**ही केलेलें नाहीं. **एल्फिन्स्टन** वगैरे मंडळीचें अध्ययन आरंभलेल्या कामीं फारसें उपयोगाचें दिसत नाहीं. वरील आधारांचें जें जेमतेम वाचन झालेलें आहे, त्यास "अध्ययन" असें जाडें नांव देणें मलाच विशोभित भासतें. "अध्ययन" व "अध्यापन" असले शब्द व त्यांचे यथार्थ अर्थ " लिहून मजकूर पाठविणारां" कडेस व त्यांच्या सारख्या "कैवाऱ्यां" कडेस सांपडतील. इतकी प्रस्तावना पुढील मजकुरास बस आहे.

**तुकारामबोवा** व **शिवाजी** यांच्या संबंधानें जी संतकथा आहे, तींत कितपत जीव आहे, तेंच पहिल्यानें आरंभीं पाहूं या.

**तुकारामबोवां**चा जन्मकाळ **शालि०** शके १५३० व समाधिकाळ **शालि०** शके १५७१ होय. तेव्हां निर्वाणास **तुकारामबोवा** आपले वयाचे एकेचाळिसावे वर्षी गेले, यांत शंका नको. **शिवाजी**चा जन्मकाळ **शालि** ० शके १५४९ होय. तेव्हां **तुकारामबोवांचे** निर्वाणवर्षी **शिवाजी** फार फार तर बावीस वर्षांचा होता.

**तुकारामबोवांच्या** नांवानें जे अभंग प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत खालील अभंग आहेत—

आतां हे विनवणी प्रधान अष्टक
प्रभूसी विवेक समजावा ॥
**प्रतिनिधी** मानरक्षक चतुर
सात्विकांचें घर तुह्मांपाशीं ॥ १ ॥
**मुजुमुचे** धणी लेखनकारक
पत्रींचा विवेक समजावा ॥
**पेशवे सुरनीस चिटणीस डबीर**
**राजाज्ञा सुमंत सेनापती** ॥ २ ॥

**शिवाजीनें** जवळ जवळ अठराव्या वर्षांपासून **महाराष्ट्र** लोकांच्या पूर्वींच्या वैभवाचा जीर्णोद्धार करण्यास सुरवात केली. तेव्हां **तुकाराम बोवांचे** निर्वाणवर्षी **शिवाजीच्या** चळवळीस जेमतेम चार वर्षें झालीं होतीं. शिवाजीचे अष्ट प्रधान या काळीं असण्याचा संभव बिलकूल नाहीं. **शालि०** शके० १५९६ हें **शिवाजीचें** अभिषेकवर्ष होय. या अभिषेकवर्षाच्या पूर्वी आठ दहा वर्षांपर्यंत तरी जर **तुकारामबोवा** जिवंत असते, तर हा अष्टप्रधानांचा उल्लेख कालदोषानें ग्रस्त झाला नसता. पण **शिवाजी** २२वर्षांचा होता, तेव्हां अष्ट प्रधानांची कल्पना त्याच्या स्वप्नींही आलेली असल्याचा संभव नाहीं.

अष्टप्रधान अभिषेकाचे समयीं तरी निर्विवाद होते. पण **प्रतिनिधि** हा **शिवाजीचे** कारकीर्दींत नव्हता, इतकेंच नाहीं, तर **संभाजीचे** कारकीर्दीतही नव्हता. **प्रल्हादपंतांची** कर्तबगारी व मुत्सद्दीपणा पाहून **राजाराम** सुप्रसन्न झाला, व अष्टप्रधानांच्या वर एक नवें **प्रतिनिधी** नांवाचें पद निर्माण करून तें सर्वानुमतें प्रल्हादपंतांचे हवालीं केलें. जर हे अभंग **तुकाराम बोवांनींच** केलेले, तर **प्रतिनिधि** हा शब्द त्यांत येण्याचा किती संभव आहे, त्याचा आतां वाचकांनींच विचार करावा.



**सज्ज्ञा** शब्दाचीही गति जवळ जवळ अशीच होय. हें पद **शिवाजीचे** काळीं मुळींच नव्हतें. जें पद **शिवाजीचें** काळीं मुळींच नव्हतें, त्यांचा उल्लेख **शिवाजी** बावीस वर्षांचा असतां रचले गेलेल्या अभंगांत आला कसा?

इतका कालविरोध ज्या पक्षीं आहे, त्यापक्षीं हे अभंग **तुकाराम बोवांनीं** केलेले असण्याचा संभव बिलकूल नाहीं. **तुकाराम बोवा** बोलून चालून संत होते. त्यांची भेट **शिवाजी**नें एकदा सोडून दहादा घेतली असेल; त्यांत असंभवाचा लेशही नाहीं. संतांचें व साधूंचें दर्शन घेण्याची वहिवाट आपणांमध्यें सार्वत्रिक आहे. पण **शिवाजी तुकारामबोवांच्या** दर्शनास गेला इतक्यावरून गुरुशिष्याचें नातें दोहोंमध्यें लागत नाहीं. जी कच्ची हकीकत असल्या दंतकथांमध्यें असते, ती बराच पुरावा असल्याशिवाय ऐतिहासिक समजणें किंवा ऐतिहासिक समजून ती ऐतिहासिक चरित्रांत दाखल करणें, हें माझ्या मतें रास्त नाहीं. आतां **रामदासस्वामीं**कडे वळूं या.

**रामदासस्वामींच्या** बखरेची **शालि०** शके १८१० तली दुसरी आवृत्ति बरीच पसरलेली आहे. ही बखर **चिटणिसांनीं** केलेल्या **शिवाजी**च्या सप्तप्रकरणात्मक चरित्राच्याच वर्गांतली समजल्याशिवाय गति नाहीं. **चांफळकरस्वामी हनुमंतस्वामी** यांनीं **शालि०** शके १७१५ त आपल्या शिष्यमंडळीस ही हकीकत सांगितली, असें पहिल्याच परिच्छेदांत लिहिलें आहे. तेव्हां **रामदासस्वामींचे** पश्चात् ११२ वर्षांनीं ही बखर लिहिली गेली, असें ठरतें. या बखरीचे—एक भाग पूर्वींच्या इतिवृत्ताच्या संबंधीं व दुसरा भाग **रामदासस्वामीं**च्या साक्षात् इतिवृत्ताच्या संबंधीं असे—दोन भाग करितां येतात. दोन्ही भागांची मातब्बरी किती आहे, त्याचा आतां थोडक्यांत विचार करणें आहे.

"**शालि०** शके ५१२ त **इंद्रप्रस्थीं पिठोर** राजा होता, त्याचा क्षय करून सुलतान **रुपदिल** यांनीं पैगंबराचे वेरेंकरून राज्य घेतलें, असें १४ व्या पृष्ठावर आलें आहे. या अमोलिक इतिवृत्तास **ब्रह्मनारद** पुराणाचा आधार दिला आहे! **महंमद** पैगंबर **शालि०** शके४९३ यावर्षी किंवा या वर्षाचे सुमारास जन्मला व **शालि०** शके५५४ या वर्षी किंवा या वर्षाच्या सुमारास निर्वाणास गेला. तर पैगंबर एकूणीस वर्षांचा असतां, ह्मणजे त्यानें आपला पैगंबरपणा जाहीर करण्याचे पूर्वींच हा **दिल्लीच्या पिठोर** राजाचा पराभव करून त्याचें राज्य आक्रमण करणारा अविंधधर्मी सुलतान **रुपदिल** आला कोठून? याचा एखादा पौराणिक किंवा शास्त्री जर नीट पत्ता लावील, तर दरोबस्त ऐतिहासिकांवर त्याचे मोठे अविस्मरणीय असे उपकार होतील.

पुनः १४ व्याच पृष्ठावर **विजयनगरच्या रामराजाच्या** राज्यांत **ज्ञानेश्वर** वगैरे मंडळी झाली व **हेमाड**पंत हा या **विजयनगरच्या रामराजाचा** मुख्य कारभारी, असा लेख आला आहे. **शालि०** शकाचीं साडे चवदाशें वर्षें गेल्यानंतर झालेला **विजयनगरचा** अराजवंशी **रामराजा** व **शालि०** शके १२१२ तील देवगिरीचा राजवंशी **रामदेवराव** हे दोघे बखरकारानें अभिन्न ठरवून जवळ जवळ अडीचशें वर्षे **ज्ञानेश्वरांस** खालीं ढकललें व **एकनाथाचे** त्यांस बरेच समानकालीन करून सोडिलें !!! तरी बरें, कां **ज्ञानेश्वरीच्या** शेवटीं "शके बाराशें बारोत्तरें " व शके पंधराशें बारोत्तरें" असे लेख चांगले बाळबोध येऊन गेले आहेत.

पंधराव्या पृष्ठावर "**दिल्लीपतीच्या** व **राम**·



**राजा**च्या कलहामुळें पूर्वींचे समयींही **दौलताबादेस** पादशाही नव्हती, तर सुभाच होता व देश उजाड होता तो पाहून **हल्ली**च्या सुभेदारांनीं **कौल** देऊन ··जो कोणी ग्रामाची वसाहत करील त्यास तेथील वृत्ति द्यावी, असा नेम केला; त्या समयीं **कृष्णाजी**पंत **शालि०** शके ८८४ संवत्सरांत येऊन राहिले" ही अपूर्व हकीकत दिली आहे. **विजयनगरकर रामराजा**च्या **दिल्ली**पतीबरोबर लढाया झाल्या वगैरे बखरकाराचे दरोबस्त शोध अपूर्व होत. पुढें **शालि०** शके ८८४ हा काळ देऊन **रामराजास** साडे पांचशें वर्षें पाठीं ढकललें! अठराव्या पृष्ठावर "**शालि०** शके १२०० यांत **रामराजाचेच** राज्यांतील यवन सहा जण प्रबळ होऊन त्यांनीं त्याचें राज्य हरण केलें व नंतर राजा निघोन **रामेश्वर द्रविड** प्रांतीं जाऊन राज्य करिता झाला "असें इतिवृत्त दिलें आहे. **गुलाम**शाही **शालि०** शके १२७० च्या सुमारास स्थापन झाली, व ती निबळी पडली तेव्हां **शालि०** शके १४१० च्या सुमारास पांच सरदार स्वतंत्र झाले व त्यांनीं पांच स्वतंत्र शाह्या स्थापिल्या. या काळाच्या पूर्वीं **गुलाम**शाही ऊर्फ **बेदरची** किंवा **कुलबुर्ग्याची** बादशाही एकच्छत्री व स्वतंत्र होती. **देवगिरी**कर **रामदेवरावा**चा **विजयनगर**कराबरोबर संबंध बिलकूल नव्हता. **विजयनगर**करांची गादी तेलंगी होती, **मऱ्हाठी** नव्हती. सारांश, अशा प्रकारें **रामदासस्वा**मींच्या पूर्वींचें जें ठळक ठळक ह्मणून इतिवृत्त दाखल झालें आहे, तें गडबडगुंड्यानें ओतप्रोत भरलेलें दिसतें.

आतां रामदासस्वामींच्या साक्षात् इतिवृत्ताचा विचार करूं.

**तुकारामबोवा** व **रामदासस्वामी** या दोहोंचें जन्मवर्ष एकच होय. दोहोंचाही जन्म **शालि०** शके १५३० या वर्षीं झाला. **शिवाजीस रामदासस्वामींस** भेटण्याची इच्छा होऊन "त्रयोदशाक्षरी मंत्राचा अनुग्रह **शालि०** शके १५७१ विकारीनाम संवत्सरे, वैशाख शुद्ध ९, गुरुवार (या रोजीं रामदासांनीं) केला" असें १२६ व्या पृष्ठावर आहे. आतां हें इतिवृत्त किती संभाव्य व विश्वास्य आहे, त्याचा विचार करूं.

**शिवाजी**चा जन्म **शालि०** शके १५४९ या वर्षीं झाला. या वर्षीं **प्रभव** संवत्सर होतें, अशी दरोबस्त प्राचीन लेख साक्ष देत आहेत. तेव्हां १५४८ वें वर्ष **क्षय** संवत्सराचें होतें. एक संवत्सरचक्र साठ वर्षांचें असून **प्रभवा**पासून संवत्सरचक्रास आरंभ होतो व **क्षय**संवत्सरीं संवत्सरचक्र संपतें. **विकारी** संवत्सर हें तेहेतिसावें संवत्सर **बृहत्संहिते**त दिलें आहे. तेव्हां जर **विकारी** संवत्सरीं उपदेश झाला तर तो १५८१ या वर्षीं झाला. १५७१ व्या वर्षीं झालेला नव्हे. **अफझुलखा**नाचा वध **शालि०** शके १५८१ **विकारी** नाम संवत्सरे या वर्षीं झाला, असें **सभासद** ह्मणतात. तेव्हां जर **विकारी** संवत्सरीं **रामदास** स्वामींचा उपदेश झाला, तर तो **अफझुला**च्या वधवर्षीं झाला. पण **शिवाजी** पहिल्यानें **तुकारामबोवां**जवळ गेला व त्यांनीं स्वतः ब्राह्मण नसल्यामुळें **रामदासस्वामी** ब्राह्मण होते ह्मणून त्यांच्याकडे **शिवाजीस** पाठविलें व ह्मणून **शिवाजी रामदासस्वामीं**कडेस वळला, असा ब्राह्मणांचा आग्रह दिसतो. **तुकारामबोवा** तर १५७२ त समाधिस्थ झाले. **तुकारामबोवांनीं रामदासस्वामीं**कडे पाठविल्यानंतर दहा वर्षें **शिवाजी** अनुग्रहाशिवाय राहिला, असें ह्मणणें ब्राह्मण मंडळीस पसंत पडेना. ह्मणून **शालि०** शके १५८१ तील **अफझुला**चा वध सुद्धां (पृ० १[illegible]) १५७१ या वर्षांतच ब्राह्मण मंडळीनें ढकललेला दिसतो. जर **रामदासस्वामीं**च्या बखरीवर विश्वास





अनुक्रमणिका

ठेवायाचा, तर **अफझुलाचा** वध शालि० शके १५७१ या वर्षी ह्मणजे **शिवाजी** बावीस वर्षांचा असतां झाला, असें ह्मटलें पाहिजे. जर इतर गोष्टींच्या संबंधानें ही बखर विशेष विश्वास्य असती तर **अफझुल**वधास दहा वर्षें पाठींही हटविलें असतें. पण तसें कांहीं दिसत नाहीं. **रामदासस्वामीं**चें दर्शन घ्यावयास **रायगडाहून शिवाजी** १५७१ त खालीं (पृ० ११३) उतरला, असें ही बखर सांगते. पुढेंही जिकडे तिकडे **रायगडा**बरोबरच राजधानीत्वाच्या नात्यानें संबंध लाविलेला आहे. पण जवळ जवळ अभिषेक होईपर्यंत **शिवाजी**चें कायमचें ठाणें **राजगडीं** असे. १५७१ सालीं **रायगड** हें नांव देखील नव्हतें. **रायगड**चें मुळचें नांव **रायरी** असून पुढें **शिवाजी**नें किल्ला वाढविला व वाडे वगैरे बांधून त्यास **रायगड** असें मोठें नांव दिलें. १५७१ या वर्षीं **प्रतापगड** तरी होता कोठें? तीनशें एकविसाव्या पृष्ठावर स्थळयोजना **साताऱ्यास** केलेली आहे, व "छत्रपति" शब्दाचा प्रयोग करण्यांत आलेला आहे. तीनशें एकविसाव्या पृष्ठावर आरंभिलेलें चरित्र शके १५८० या वर्षीं झालें, असा ३२५ व्या पृष्ठावर शेरा मारिला आहे. **शा-लि०** शके १५९६ हें **शिवाजी**चें अभिषेक वर्ष होय. "छत्रपति" हें बिरुद **शिवाजी**नें अभिषेकसमयीं धारण केलें. पण बखरकाराच्या मतें १६ वर्षें पूर्वीं ह्मणजे **अफझुलवधा**चे पूर्वींच घडून आलेल्या चरित्रांत **शिवाजीचें** "छत्रपति"-त्व दाखल होतें!!! इतक्यानें कदाचित् स्थूलबुद्धि वाचकाच्या मनांत बखरींत वर्णन केलेल्या इतिवृत्ताच्या संबंधानें शंका येणार नाहीं अशी शंका जर्शी कदाफाय येऊन, स्थूलबुद्धि वाचकानेंही निःशंकपणें कवडीपेक्षांही या बखरीचें मोल कमी समजावें, अशाच हेतूनें तीनशें बावीसाव्या पृष्ठावर "**रामदासस्वामी शाहूछत्रपतीचे गुरु** आहेत असें समजतांच" असा लेख ठोकण्यांत आला आहे. हें एकच गडबडगुंड्याचें व घोटाळ्याचें ठळक उदाहरण बखरीचा कुचकामीपणा व नादानपणा सिद्ध करण्यास समर्थ नाहीं काय? संवत्सरांच्या संबंधानें १५७१ या वर्षींच घोटाळा झाला आहे, असें नाहीं. तर पुढेंही दाखल केलेल्या संवत्सराच्या नांवांची तीच स्थिति आहे. १५७१ या वर्षाचा तरी ठिकाणा कोठें आहे? १२६ व्या पृष्ठावर ७१ वें **विकारी** संवत्सर ठोकलें आहे; पण १५० व्या व १८८ व्या पृष्ठावर १५७१ वेंच वर्ष **विरोधी** संवत्सर ठरविलें आहे. **विकारी** ३३ वें असून, **विरोधी** २३ वें आहे. १८९ व्या पृष्ठावर १५७२ वें वर्ष तर **विक्रम** ह्मणून बखरकार ह्मणतात!!! **विक्रम** हें संवत्सरचक्रांत १४ वें संवत्सर समजतात. २०४ व्या पृष्ठावर १५७२ वें वर्ष **विकृति** संवत्सर ह्मटलें आहे. विकृति हें संवत्सर संवत्सरचक्रांत २४ वें असतें. २०९ व्या पृष्ठावर १५७३ वें वर्ष **खर** ठरविलें आहे. **खर** हें २५ वें संवत्सर होय. तेव्हां संवत्सरांच्याही संबंधानें बखरीमध्यें सः घोटाळाच आढळतो. असल्या घोटाळ्यांनी भरलेल्या प्रायः असबद्ध, व पूर्वापरविरुद्ध मजकुरावर विशेष विश्वास ठेवणें वाजवी नाहीं तेव्हां **तुकारामबोवां**च्या व **रामदासस्वामीं**च्या संबंधानें ज्या दंतकथा प्रचलित आहेत त्या बाहेरील दुसरा मजबूत पुरावा मिळाल्याशिवाय ऐतिहासिक किंवा यथार्थ समजणें ही मोठी चूक आहे. **तुकारामबोवां**ची किंवा **रामदासस्वामीं**ची **शिवाजी**नें मुळींच भेट घेतली नाहीं, असें ह्मणण्याचा माझा आशय नाहीं. दोघेही नांवाजलेले संत पडले. साधुसंतांचें दर्शन घेण्याचा जसा इतर धर्माच्या लोकांचा तसा आपल्या धर्माच्या लोकांचाही संप्रदाय आहे








अनुक्रमणिका

**तुकारामबोवांचें** व **रामदासस्वामींचें** दर्शन **शिवाजीनें** घेतलें, असें मानिल्यास त्यांत कांहीं असंभाव्य नाहीं. पण पहिल्यानें **शिवाजी** **तुकारामबोवांस** शरण गेला व **तुकारामबोवांनीं प्रतिनिधी** वगैरे प्रधानांची यादी दाखल केलेलें अभंगमय पत्र लिहून **रामदासस्वामीस** शरण जाण्यास सांगितलें, त्यामुळें **रामदासस्वामींस** शरण जाऊन **शिवाजीनें** त्यांच्यापासून मंत्रोपदेश घेतला व त्यांस आपलें राज्य अर्पण केलें, असल्या प्रकारचा इतिवृत्तासारखा भासणारा जो मजकूर आढळतो, तो बाहेरचा दुसरा मजबूत पुरावा मिळाल्याशिवाय इतिवृत्ताप्रमाणें समजणें, ही मोठीच चूक दिसते. दोन्ही संतशिरोमणींच्या शिष्यमंडळींनीं आपापल्या गुरूंचें माहात्म्य वाढविण्यासाठीं असल्या दरोबस्त कथा प्रचलित केलेल्या समजल्याशिवाय गति नाहीं. सारांश, **रामदासस्वामींची** बखर ही **चिटणीसकृत** चरित्राप्रमाणें **भाकड बखर** होय, **भूतार्थ बखर** नव्हे. जर **तुकारामबोवांशीं** किंवा **रामदासस्वामींशीं** तत्तच्छिष्यमंडळी मानते त्या प्रकारचा अगदीं निकटचा संबंध **शिवाजीचा** असता, तर **सभासदांसारख्या** तत्कालीन ब्राह्मणानें त्याच्या विषयीं कोठें ना कोठें थोडा बहुत तरी उल्लेख केला असता काय? **सभासदां सारख्या महाराष्ट्र ब्राह्मणानें** असल्या संबंधाचें दिग्दर्शन सुद्धां केलें नाहीं, हा एक बळकट मुद्दा असल्या प्रकारच्या संबंधाचा केवळ अभाव सिद्ध करीत नाहीं काय?

जी गोष्ट ऐतिहासिक समजण्यास बिलकुल पुरावा नाहीं, ती ऐतिहासिक चरित्रांत दाखल करणें केवळ इतिवृत्तावर चरित्र लिहूं पाहणाऱ्या ग्रंथकारांचें काम नव्हे. **बापटांसारख्या** चरित्रकारांनीं व ग्रंथकारांनीं दरोबस्त ब्राह्मणमंडळीचें सर्वतोमुख निष्कलंकत्व दाखविण्यासाठीं अतिशयोक्तीनें भरित व निराधार अशा अप्रामाणिक कथा खुशाल प्रमाण मानाव्या, व तसल्या कथांवर मनोराज्यमय इमारती बांधून **राघोबादादासही** **शिवाजीच्या** वर्गांत खुशाल घालावें; इतकेंच नाहीं, तर **राघोबा दादास** सूर्य बनवून, **शिवाजीस** त्याच्या पुढें खद्योतही ठरवावें. पण तो मार्ग नुकत्याच निर्दिष्ट केलेल्या पैकींच कित्येक ग्रंथकारांच्या मतें "कालाचा अपव्यय करून लेखणीस शीण देणाऱ्या व घाणेरडीं पुस्तकें लिहिणाऱ्या" मजसारख्या सर्व प्रकारें क्षुद्र व क्षुल्लक प्राण्यास पसंत नाहीं, तेथें नाइलाज आहे. "असलीं चरित्रें वाचून कोंवळ्या अर्भकांच्या मनावर वाईट परिणाम होईल" वगैरे आरोप मजसारख्यावर असल्या मंडळीनें खुशाल आणावे. माझ्या अल्पमती प्रमाणें व समजाप्रमाणें मी त्यांचीं मनें भूषित करितों, दूषित करीत नाहीं. जी मंडळी मी अर्भकांचीं मनें दूषित करितों असें समजते, त्या मंडळीनें आपलीं व आपल्या मित्रमंडळीचीं मुलें शाळेंतून खुशाल काढावीं. जे सद्गृहस्थ माझें आचरण इतकें निंद्य समजतात व माझीं पुस्तकें इतकीं "घाणेरडीं" किंवा "कंटाळवाणीं" समजतात, त्यांस दुसरा जबाब देण्या जोगा नाहीं. तो जबाब पूर्वी एकदा दिला व आणखीं जितके ह्मणून प्रसंग येतील तितक्याही प्रसंगीं तो [illegible] टरीत व अभिन्न जबाब मिळेल. असल्या प्रसंगाच्या संबंधानें मला अतिशय खेद होतो, तो इतक्यासाठींच कीं नसतें गुरुशिष्याचें नातेंही लावून अनृत भाषणाचा प्रसंग लेखकांस ओढून आणावा लागतो. असो.

**दादोजी कोंडदेवाच्या** इतिवृत्ताचीही गति जवळ जवळ अशीच आहे. **दादोजी कोंडदेवानें**



अनुक्रमणिका

उपदेश केला झणून **शिवाजी** सुधारला व महापुरुष झाला, असें ह्मणण्यास आधार बिलकूल नाहीं. अशा प्रकारचें **दादोजीचें शिवाजी**वरचें वजन शाबीत करण्यास **सभासदां**चा लेख नाहीं. उलट **बुंदेल्या**च्या हकीकतींत **शिवाजी** आपलें ऐकत नाहीं असें पाहून **शहाजी**कडून येणारा टपका सोसण्याचें सामर्थ्य आंगीं नसल्यामुळें **दादोजीनें** विषप्राशन करून आत्महत्या केली, असा लेख आहे. **ऑर्म**मध्यें या हकीकतीच्या संबंधाचें कांहीं आढळलेलें स्मरत नाहीं. असल्या संबंधाचे **ऑर्म**चे उल्लेख असतात, त्यांत सांगण्यासारखा जीव नसतो. **मऱ्हाठ्यांकडची** माहिती ऑर्मनें फारच थोडी दिलेली असते. तसली माहिती त्यास मिळण्याचा फारसा संभव नव्हता. अविंधांस या विषयाची माहिती फारशी असण्याचा संभव नाहीं. जेथें अविंधांचा संबंध असेल, तसल्या ठिकाणीं अविंधांची माहिती बरीच तपशीलवार असते. पण **दादोजी**च्या संबंधाची माहिती त्या काळच्या **मऱ्हाठ्यांकडेस** मुख्यत्वेंकरून लागायाची. **मऱ्हाठे अवरंगझेबा**च्या छावणींत पुष्कळ होते ह्मणून त्यांच्याकडून **दलपत** बुंदेल्याच्या मंडळीमध्यें असली माहिती प्रसंगवशें थोडी बहुत पसरण्याचा संभव आहे. तेव्हां **सभासदां**चा लेख **दादोजीचें** गुरुत्व किंवा उपदेशकत्व मानण्यास अनुकूळ नाहीं; इतकेंच नाहीं, तर **बुंदेल्याचा** लेख तसला समज होण्यास फारच प्रतिकूळ आहे. **बापटांचें दादोजी कोंडदेव** हें पुस्तक त्यांच्या **बाजी**रावाच्या चरित्राप्रमाणें केवळ कादंबरी होय. कांहीं वर्षीनीं कित्येक कोत्या समजुतीच्या ब्राह्मणमंडळीमध्यें हें पुस्तक **रामदासस्वामीं**च्या चरित्रा प्रमाणें जरी अस्सल मानिलें गेलें, तरी त्याची किंमत अल्पविवेकाच्याही पुरुषास निःसंशय कळून येईल. कोणताही ऐतिहासिक चरित्र लिहिणारा पुरुष असल्या भाकड कथांकडेस पुढें कधीं तरी लक्ष पोंचवील, असें वाटत नाहीं.

आतां **मलिकंबर** व त्याचा मुलगा **फत्तेखान** यांच्या संबंधानें, **चंद्रराव मोऱ्याच्या** खुनाच्या संबंधानें व अफझुलाच्या वधाच्या संबंधानें, असे तीन "मजकूर लिहिणारांनीं" मुख्य आक्षेप आणिले आहेत, त्यांचा विचार झाला पाहिजे.

**१–मलिकंबर व त्याचा मुलगा फत्तेखान.**

**क**— "**अहमदनगर मोंगलां**नीं घेतल्यानंतर, **मलिकंबर** नांवाचा **हबशी** होता व **राजू** नांवाचा दक्षिणी होता, यांनीं राहिलेला मुलुख वांटून घेतला. **तेलंगणा**चा भाग **मलिकंबरानें** घेतला; व वर **गुजराथे** पर्यंत व खालीं **अहमदनगर** पर्यंत मुलूख राजूकडेस असून, **मोर्तिझा** नांवाचा राजवंशी होता त्यास गादी मिळाली. इ०स० १६०३ मध्यें **मलिकंबरानें मोंगलांस** बोलावून, राजूचा मोड केला; व **राजूस** कैद करून त्याचा मुलुख आपण बळकाविला. **जहांगीर**चे कारकीर्दींत **मलिकंबरानें** थोडा बादशाही मुलूखही बळकाविला. पुढें **शाहाजहानास मोंगलां** पासून घेतलेला मुलूख आपण होऊन **मलिकंबरानें** परत केला. इ०स १६२६त आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी **मलिकंबर** वारला. **मलिकंबरा**चा मुलगा **फत्तेखान. मोर्तिझा**नें **फत्तेखानास** कैदेंत ठेविलें. **फत्तेखानाची** बहीण ती **मोर्तिझा**ची आई पडली. तिच्या विनवणीनें **मोर्तिझानें फत्तेखानास** कैदमुक्त केलें; इतकेंच नाहीं, तर सैनापत्येही दिलें. तेव्हां **फत्तेखानानें** एका दिवसांत २५ उमराव ठार मारिले; व **शाहाजहानास** कळविलें कीं हें सर्व तुझ्यासा-




अनुक्रमणिका

ठीं केलें. **शहाजहानानें मोतिंझास** मारण्यास सांगितलें. तेंही काम करून, **मोतिंझाचा** एक मुलगा **हुसेन** नांवाचा दाहा वर्षांचा होता, त्यास गादी दिली. नंतर **शहाजहानानें** दरोबस्त **निझामशाही** जवाहीर वगैरे मागितलें. तें देण्यास थोडा वेळ लागला. तेव्हां **दिल्ली**पतीनें फौज पाठविली. पण आठ लाख रुपये रोख देऊन व करभार देण्याचें कबूल करून **फत्तेखान** संकटमुक्त झाला. नंतर **दौलताबाद** घेण्याचा **अदिलशहाचा** बेत दिसल्यामुळें, आपण होऊन **दौलताबाद मोंगलां**च्या घरीं **फत्तेखानानें** घातली; व **अदिलशहास** कळविलें कीं ' **तिमूरच्या वंशाच्या घरांत केर काढ, पण अदिलशाहीची वझीरी पत्करूं नको**' असें बापानें सांगून टेविल्यामुळें आपण असें काम केलें. "

ज्या **मोंगलांस मलिकंबरानें राजूचा** मोड करण्यासाठीं ह्मणून आंत ओढिलें, त्यांची कृत्यें कशीं तीं पाहूं या.

**ख**—"**बुऱ्हाण** इ० स० १५९४ त वारला. **बुऱ्हाण**चा मुलगा **इब्राहिम** गादीवर बसला. पण चार महिन्यांनीं **विजापुरकरां**बरोबर लढाई झाली, तींत तो पडला. याच्या मरणानें **अहमदनगरीं** फळ्या झाल्या. **इब्राहिम**चा धाकटा मुलगा **बाहादूर** याचा पक्ष **मीनमंजूनें** उचलला. फळ्या मोडणें दुसऱ्याच्या मदतीशिवाय जड जाईल, असें पहिल्यानें वाटल्यामुळें **मीनमंजूनें मुरादास** मदतीस बोलाविलें. पण **मुराद** येण्याच्या पूर्वींच **मीनमंजूनें** सर्व फळ्या मोडून टाकिल्या. **मुरादा**बरोबर तह झाला. पण कित्येक उमराव ऱ्हर्मटपणा करूं लागले, व **चांद बिबीनें** न दिलेले असेही कित्येक परगणे **मुरादानें** उपटले... पुढें **चांदबिबीचाही** खून झाला"

ज्यांची मदत **मलिकंबर** घेतो, त्या **मोंगलांनींच** असल्या प्रकारची ढवळाढवळ करून **निझामशाहीचें** वाटोळें नुकेंच केलें होतें.

वरील **क** व **ख** हे दोन्ही उतारे **फिरिस्त्या**मधील आहेत. पहिल्या उताऱ्यावरून **मलिकंबर** व **फत्तेखान** या बापलेकांची योग्यता लागलीच कळून येते.

## २—चंद्रराव मोऱ्याचा खून.

हल्लीं जो पुरावा उपलब्ध आहे, त्यावरून **शिवाजी**चें आंग खुनांत होतें, असें ह्मणणें निदान मला बरेंच जोखिमाचें काम दिसतें. उद्यां जर अधिक तत्कालीन व वास्तविक पुरावा येईल, तर माझा समज निःसंशय बदलेल; व तसें झाल्यास "एको हि दोषो गुणसंनिपाते" या न्यायाचा नीट व उपपत्तिपूर्वक मी आश्रय करीन. पण तोंपर्यंत **आंग्ल ग्रंथकारां**नीं व **शिवाजी**चा गुणोत्कर्ष डोळ्यांत सलणाऱ्या कोत्या मनाच्या "लिहून मजकूर पाठविणाऱ्या" सारख्या ब्राह्मणांनीं कितीही कंठरवानें जरी त्या खुनाचा आरोप **शिवाजी**वर केला तरी माझा समज यत्किंचित्‌ही बदलणार नाहीं.

**सभासदांनीं** "मारणें" या शब्दाचा एक स्थळीं उपयोग केला आहे. पण "मारणें" हा शब्द दुर्दैवानें बऱ्याच संदिग्ध अर्थी वापरला जातो. पैठ "मारली" ह्मणजे पेठेतल्या लोकांची "कत्तल केली" असा अर्थ होत नाहीं. **ग्रांट डफ** देखील खून करण्याची मसलत मुळची **शिवाजी**ची समजत नाहीं. ही मुळची मसलत **रघुनाथ**पंताची असून ती त्यानें **संभाजी कावजीस** कळविली. **संभाजीस** ती अर्थातच पसंत पडली. यावेळीं **रघुनाथ**पंत व **संभाजी** हे दोघेही **जावळी** मुक्कामीं [illegible]. पुढें **रघुनाथ**पंतानें **शिवाजीस** मसलतीबद्दल चिठ्ठी लिहिली व ती मसलत **शिवाजीनें** पसंत केली, असें **ग्रांट डफ** ह्मणतो. तेव्हां **ग्रांटडफ**च्या बख-





अनुक्रमणिका

री वरून ही मसलत मुळची **रघुनाथ**पंताचीच ठरते. पुढें **शिवाजीस** जी लेखी कळविली व **शिवाजीनें** ती लेखी पसंत केली, या दोन मुद्यांच्या संबंधानें चांगला पुरावा पाहिजे. विशेष पुरावा पाहिजे तो दुसऱ्या मुद्याच्या संबंधानें पाहिजे. **रघुनाथ**पंताच्या हातची चिठ्ठी मिळाली, तरी पुरावा अपुर्ता राहतो, असें मला वाटतें. पण **रघुनाथ**पंताच्या हातची चिठ्ठी देखील **ग्रांट डफ**च्या पाहण्यांत आलेली दिसत नाहीं. जर ती पाहण्यांत आली असती तर जसा **शहाजहानानें** व **अवरंगझेबानें** पाठविलेल्या पत्रांचा उल्लेख टीप देऊन पूर्वींच्या पृष्ठांवर करण्यांत आला आहे, तसाच या पृष्ठावरही तो उल्लेख करिता. विशेष महत्त्वाचे मुद्दे असतात, तेथें पत्रव्यवहाररूपी सांपडलेल्या पुराव्याचा उल्लेख **ग्रांटडफ** केल्याशिवाय राहत नाहीं. **शिवाजी**वर खुनाचा आरोप आणणें, हा मुद्दा निःसंशय विशेष महत्त्वाचा होय. तेव्हां **ग्रांट डफ**च्या तरी नजरेस **रघुनाथ**पंतानें पाठविलेली चिठ्ठी पडली नव्हती व **शिवाजीनें** पाठविलेलें पत्र किंवा असलेंच दुसरें कांहीं त्याच्या हातीं लागलें नव्हतें, असें अनुमान निघतें. या संबंधाची माहिती **बुंदेल्यानें विजापुर**च्या दफ्तरांतून घेतलेली असायाची, व जेथें जेथें अविंधांचा पराभव होई तेथें तेथें त्यांस दग्याशिवाय दुसरें कारण सुचत नसे. या काळची अविंधी हवाच कांहीं अशी विलक्षण झाली होती. असल्या मुद्याच्या पुराव्यास मऱ्हाठी लेख अधिक हवे आहेत. अविंधी लेखांपासून असल्या मुद्यांची विशेष फोड होणें नाहीं. जर **शिवाजीनें** [illegible] खून या काळाच्या पूर्वी किंवा पुढें केलेला असता, तर त्याच्यावर खुनाचा आरोप करण्यास मला यत्किंचितूही संकोच वाटला नसता. पण या काळाच्या पूर्वी **शिवाजीनें** असा खून केलेला नाहीं, व पुढेही केलेला नाहीं. तेव्हां दुसरा आगंतुक पुरावाही मिळत नाहीं. असें जर आहे, तर त्याच्यावर आज **चंद्ररावा**च्या खुनाचें ओझें काय समजून व कसें लादावें, तें समजत नाहीं. **शिवाजी**च्या नांवावर केवळ काळिमा लाविण्यासाठीं उतावळें होऊन हवें तितकें **आंग्लांचें** अनुकरण" लिहून मजकूर पाठविणारांच्या" वर्गातील ब्राह्मणमंडळीनें खुशाल करावें. आपआपल्या जातीचा अभिमान कांहीं नाशकारक किंवा अपायकारक नाहीं. पण आपआपल्या जातीचा दुरभिमान व इतर जातींचा निकृष्टत्वारोपपूर्वक उघड किंवा गूढ द्वेष हे मात्र कोणत्या उन्मार्गानें पुरुषास घालवतील, त्याचें अनुमान करितां येत नाहीं, असें " लिहून मजकूर पाठविणाराच्यां " व केरळकोकिळासारख्यांच्या लेखावरून ह्मणणें भाग पडतें.

**शिवाजी**च्या वेळच्या प्रत्येक कारकुनास लष्करी अधिकारही असे. ज्या काळीं खून झाला, त्या काळीं देखील ५०० किंवा ७०० लोकांवर **रघुनाथ**पंताचा लष्करी अधिकार असण्याचा संभव आहे. तेव्हां ५००किंवा७००लोकांवर **रघुनाथ**पंतास नेमिलें यांत **शिवाजीनें** त्याची बढती केलेली दिसत नाही. जर **शिवाजीनें** दोनहजारी किंवा पांचहजारी **रघुनाथ**पंतास दिली असती, त[illegible] बढती होती. कमींत कमी तीन **रघुनाथ**पं[illegible] **शिवाजी**चे कारकीर्दींत होऊन गेले. एक **चंद्ररावाचा** खून करणारा **रघुनाथ**पंत सबनीस दुसरा **रघुनाथ**पंत न्यायाधीश व तिसरा **रघुनाथ**पंत हणमंते. या पैकीं पहिला लष्करी खात्यांत असून, तिसरा मुत्सदीमंडळांत होता. दुस[illegible] **रघुनाथ**पंत हा शास्त्री असून, **जयसिंगा** कडे [illegible] **शिवाजीनें** याचीच योजना केली होती. अ[illegible]




अनुक्रमणिका

खरी स्थिति असतां, केवळ माझ्या लेखावर कोणत्या तरी प्रकारानें हरताळ लाविण्यासाठीं म्हणून "लिहून मजकूर पाठविणारे" गृहस्थ **रघुनाथपंत** सबनीस व **रघुनाथपंत** न्यायाधीश हे अभिन्न समजतात!!! या गृहस्थांस माझी हात जोडून अतिविनयपूर्वक इतकीच विनंती आहे कीं पुनः लेख लिहितांना असला घोटाळा त्यांनीं कृपा करून करूं नये, म्हणजे मजवर मोठे आभार होतील.

क्लैवनें बनावट सही केली ती कांहीं त्याच्या वरिष्ठांनीं सांगितली म्हणून केली नाहीं, तर ती त्यानें आपल्या जोखिमावर केली. जर क्लैवच्या बनावट सहीचा दोष त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडेस येत नाहीं, तर **रघुनाथ**पंतानें केलेल्या खुनाचा दोष **शिवाजी**कडेस येत नाहीं, इतकाच माझा पहिला मुद्दा आहे. न्यायीपणाचा मोठा आव घालणाऱ्या व आमच्यापेक्षां आपणांस विशेष सुधारलेले म्हणविणाऱ्या **आंग्लांनीं** क्लैवची त्यानें केलेल्या कामगिरीबद्दलची वर्तती वरून जें उदाहरण घातलें, त्याच्या पेक्षां आंग्लांच्या समजुतीनें कमी सुधारलेल्या आमच्या **शिवाजी**नें न्यायीपणाचा यत्किंचित्‌ही आव न घालतां **रघुनाथपंता**ची बर्तती न करून जें मूकोदाहरण घातलें, तें अधिक उदाहरणीय समजलें पाहिजे, इतकाच माझा दुसरा मुद्दा आहे. "लिहून मजकूर पाठविणारां"च्या शुष्क वाग्जाळानें हे दोन मुद्दे ढांसळण्यासारखे नाहींत.

### ३—अफझुलखानाचा वध.

आमच्या देशी भाषेंतील दरोबस्त लेख दगलबाजपणाचा आरोप **अफझुला**वरच आणितात. **शिवाजी**नें दग्यास आरंभ केला, असें म्हणणारा लेख आमच्या देशी भाषेंत आजपर्यंत आढळलेला नाहीं. या दरोबस्त जातींच्या मऱ्हाठ्यांच्या समजास अनुसरून **अफझुल**खानाचाच पहिल्यानें दगा असावा, असें यथाशक्ति चरित्राच्या २७ व्या पृष्ठावर आरंभींच समर्थन करण्यांत आलें आहे. तें समर्थन कोणीही मुद्देसूद रीतीनें खोट पाडण्यास यत्न करावा. माझी शक्ति असल्यास मी जबाब देण्यास चुकणार नाहीं. उगीच वाग्जाळ विणण्यांत व **आंग्ल** ग्रंथकारांच्या नांवांची यादी मजपुढें झुगारून देण्यांत अर्थ नाहीं. जेथें अविंधांचा पराभव होई, तेथें दग्याशिवाय त्यांस दुसरें दिसत नसे. या काळची जशी **हिंदुस्थानां**तील तशीच **महाराष्ट्र**मंडळांतीलही दरोबस्त अविंधी हवा दग्यानें भरली होती, या मुद्याचें समर्थन प्रसंग आल्यास सोपपत्तिक करण्यास आळस होणार नाहीं. जुन्या **आंग्ल** ग्रंथकारांस आमचे देशी लेख पूर्वी मिळालेले नव्हते; **ग्रँट डफ्** यांस पहिल्यानेंच ते मिळाले.* पण त्यांचीही बुद्धि अविं[illegible] लेखांकडेस कलली, हें उघड आहे. **अफझु**[illegible]च्याच मनांत दगा होता, यास आमच्या देशी भाषेंतील या काळचे व या काळाच्या पुढचेही दरोबस्त स्वतंत्र लेख आधार होत. इतकें ऐकमत्य जर आमच्या प्राचीन लेखांमध्यें आहे व जर या ऐकमत्याचें नीट सोपपत्तिक समर्थन करितां येत आहे, तर असल्या स्थळीं आधार देण्याची बिलकूल गरज दिसत नाहीं.

शेवटीं "लिहून मजकूर पाठविणाऱ्या गृहस्थां"स मी इतकीच विनंती करितों कीं पुनः काम करायाचें, तें त्यांनीं कृपा करून अधिक मुद्देसूद करावें. एकेक मोठा मुद्दा काढून त्या मुद्याचे समर्थक जे अवांतर मुद्दे असतील ते त्या मोठ्या मुद्याच्या खालीं क्रमवार व थोडक्यांत तपशीलवार दिलेले असले, म्हणजे मजसारख्या स्थूलबुद्धीचा रिघाव होण्यास वि-

* या संबंधाचे **स्कॉट वेरिंग** या **आंग्ल** ग्रंथकाराचे लेख उभयपक्षांनीं व मुख्यत्वें करून नेटिव्ह ओपिनिअन पत्रांतील निनावी लेख[illegible]नीं पाहण्यासारखे आहेत. ते स्वर्ग० यशवंत आनंदराव उदासकृत महाबळेश्वरवर्णनाच्या प्रस्तावनेंत आले आहेत.—विज्ञा० वि० कर्ते.





अनुक्रमणिका

शेष अडचण पडणार नाहीं. इतकी मजवर त्यांनीं पुढच्या खेपेस कृपा करावी, अशी माझी त्यांस सविनय हात जोडून प्रार्थना आहे. बाकी गांच्या इतर व प्राकृत उद्गारांकडेस मी लक्ष पों चविलें नाहीं, त्याबद्दल ते क्षमा करतीलच, पुन: भेटीची प्रतीक्षा चातकाप्रमाणें करीत आहें. इतकें लिहून इतका वेळपर्यंत नाइलाजानें "शिणवलेली" लेखणी आतां आटपतों.

**राजाराम रामकृष्ण भागवत.**

२१, सप्तेंबर, १८८९.

**ता० क०--ऑर्म**मधून **शिवाजी**च्या संबंधानें दोन उतारे फारच समर्पक समजून येथें जसेच्या तसेच उतरून घेतों. ते आपण कृपा करून तसेच छापा, अशी अशा बाळगतों.

P. 174— "He (Carré) admires Sevaji's character with enthusiasm; compares him to Gustavus Adolphus and Julius Cæsar and ascribes to him all the qualities of a consummate hero and sovereign." **कारे** हा पाश्चात्य गृहस्थ इसवी सन १६६८त **सुरत** मुक्कामीं आला होता. आतां स्वतः **ऑर्म**चेंच ह्मणणें उतरून घेतों.

P. 93 and 94—Sevaji possessed all the qualities of command: every influence, however latent, was combined in his schemes which generally comprehended the option of more than one success; so that his intention could rarely be ascertained, and when accomplished, did not discover the extent of its advantages, until developed by subsequent acquisitions. In personal activity he exceeded all generals of whom there is record; for no partizan appropriated to services of detachment alone ever traversed as much ground as he at the head of armies. He met every emergency of peril, howsoever sudden and extreme with instant discernment, and unshaken fortitude; the ablest of his officers acquiesced to the eminent superiority of his genius; and the boast of the soldier was to have seen Sevaji charging sword in hand."

"Thus respected, as the guardian of the nation he had formed, he moved everywhere amongst them with unsuspicious security, and often alone; whilst his wiles were the continual terror of the princes with whom he was at enmity, even in the n... of their citadels and ... Whensoever we shall obt... history of his life written i... own country, he will do... appear to have posses... highest resources of... joined to undau... which althoug... counter of ... always preferred to su... it by circumvention; which, if impracticable no arm exceeded his in open daring. *Gallantry must lament that it should once have been stained by the blood of assassination.*

शेवटचें वाक्य अविंधांकडून मिळालेल्या माहितीवर लिहिलें गेलें आहे, इतकें मात्र विसरतां कामा नये. **ऑर्म** हा इसवी सन १८०१ मध्यें वारला. ज्या पुस्तकांतून वरील उतारे घेतले आहेत, तें इ० स० १७८२ मध्यें छापलें गेलें.





अनुक्रमणिका

## स्फुट विषय.

### पाण्याचें झाड.

आफ्रिका खंडांतील मोठमोठ्या रानांमध्यें प्रवासी जनांला पाणी मिळत नाहीं. अशा स्थळीं परमेश्वरानें झाडापासून मनुष्यांस पाणी मिळावें अशी योजना करून ठेविली आहे. जेव्हां कोणेकास तहान लागते, तेव्हां त्या रानांत आढळणाऱ्या एका जातीच्या झाडाला चाकूनें खांच करावी, आणि खालीं भांडें धरावें ह्मणजे ज्यांतून पाणी निघाल्या प्रमाणें स्वच्छ पाण्याची धार लागून भांडें भरतें, आणि त्या- ...योगानें उष्णतेच्या आणि तृषेच्या त्रासापा- ...नुष्य मोकळा होऊन शांत होतो. असें ...वारंवार वाचीत असतों. त्या झाडाला ...चें झाड किंवा पाण्याचें झाड ह्मणतात. ...आकृति पुस्तकांमध्यें आढळतात. पण ...मच्या या मुंबईमध्यें बरीच आ- ...ना बरें ठाऊक असेल? ए- ...मध्यें आपण शिरलों, ह्मणजे ... ...वर जें एक मोठें वर्तुळाकृती स्थ... ..., त्याच्या सभोंवतीं सकृद्दर्शनीं नारळीच्या झाडांसारखीं दिसणारीं आणि केळींच्या पानांसारखीं पानें असणारीं' जीं पांच सात झाडें दिसतात तींच हीं पाण्याचीं झाडें. या झाडांचा बुंधा नारळीच्या माडासारखा किंवा पोफळीसारखा जरी कांहींसा दिसतो, तरी मध्येंच तो जाडा होऊन पुनः वर बारीक होत गेलेला असतो. यांचीं पानें केळींच्या पानांसारखीं जरी दिसतात, तरी त्या पानांच्या दांड्यांची ह्मणजे देंठांची रचना अमळ चमत्कारिक असते. ह्मणजे—तीं पानें केळीच्या पानांसारखीं झाडाच्या सभोंवतीं न वाढतां, उजव्या बाजूला अर्धीं आणि डाव्याबाजूला अर्धीं, अशीं एकावर एक नीट रचून ठेवल्यासारखीं वाढत जातात. याला बारीक बारीक बोंडें येतात, आणि केळ्यासारखीं प... अगदीं क्षुद्र फळें येतात. या झाडांमध्यें निरनि...व्य' दोन तीन जाती आहेत असें दिसतें. झाडांचे देंठ टोंचले तर त्यांतून कांहीं पाणी नि...घतें, पण तें पुष्कळ नसतें, आणि तितकें स्वच्छ नसतें. कदाचित् हा जमिनीचा आणि हवेचा गुण असेल. मुंबईतील श्रीमंत लोकांच्या बागांमध्यें आणि बाहेरही अनेक स्थळीं अलीकडे हीं झाडें लाविलेलीं दृष्टीस पडतात. यांना साधारणतः 'विलायती केळी' ह्मणतात. 'विलायती' हा शब्द हल्लीं फा... सोईचा झाला आहे. कांहीं नवें पाहिलें ...ा तें झालें विलायती तसें कांहीं तरी विलायतेंत ह्मणजे इंग्लंडांत असो किंवा नसो त्याची कांहीं अडचण नाहीं.

---

### केसा, केस.

मुंबईत देणेंघेणें करणाऱ्या मारवाडी लो...कांच्या बोलण्यामध्यें 'केसा' हा शब्द वारं... येतो. 'केसा' ह्मणजे कर्जदाराच्या मालाची ज... करण्याचा, किंवा त्याला कर्जाबद्दल पक... तुरुंगात नेण्याचा हुकूम, असा आहे. या ...ब्दाची उत्पत्ति ca... 'कॉसा' अथवा 'कॉ... ह्मणजे मुकद्दमा. या 'कॉसा' शब्दाचा अप... 'केसा.' 'अमुक मनुष्यावर केसा काढला ... ह्मणजे त्याला पकडून तुरुंगांत नेण्याचा ... मिळविला आहे. याचाच दुसरा एक इंग्रजी ...भ्रंश 'case केस' असा आहे. याचा मूळ... तोच. तंटा, प्रकरण, कज्जा, अशा अ... प्रयोग करितात. मराठीमध्यें त्या शब्द... आलें आहे. 'काल ती 'केस' कोर्टांत... होती,' इत्यादि.

Printed at the "Ganpat Krishnaji's" Press, Bombay, 31-10-89.





अनुक्रमणिका

१. **स्त्रियांची गुलामगिरीपासून सुटका.**—हा निबंध रा. रा. माधव सदाशिव केळकर यांनीं लिहिला. यांतील निरनिराळीं प्रकरणें पाहतां, निबंधास दिलेलें नांव अन्वर्थक दिसत नाहीं. पुष्कळसा भाग प्रार्थनासमाजविषयक चर्चेनें भरला आहे, आणि तिकडे समाजिस्टांचें लक्ष जावें हाच लेखकाचा प्रधान हेतु दिसतो. या पुस्तकास प्रो. वेलिणकर यांनीं जी लहानशीच प्रस्तावना जोडली आहे तींत लिहिल्याप्रमाणें, "लोकांमध्यें विचारजागृति व्हावी व त्यांचें अंतर्याम पाजळावें(?)" एवढाच लेखकाचा उद्देश असल्यामुळें, प्रस्तुत पुस्तकाचा विशेष प्रसार झाल्यानें तो सफळ होण्याचा संभव आहे. पुस्तकाचीं अष्टपत्री सांच्याचीं ८० पृष्ठें आहेत, किं. १ रुपया आहे, आणि तें "रा. रा. द्वारकानाथ गो. वैद्य, युनिव्हर्सिटी आफीस, मुंबई," या पत्त्यावर मागविलें असतां मिळेल.

२. **सुवर्णाकाव्य.**—बुद्धाचे आयुष्यांतील एक प्रसंग घेऊन रा. रा. महादेव काशिनाथ कारखानीस, बी. ए., पुणें, यानीं हें १०८ श्लोकांचें काव्य रचिलें आहे. कविता सुरस झाली आहे. किंमत दोन [illegible]णे.

३. **कन्यादानफल**—बृहत्कथासागरांतील सुलोचनेच्या कथेच्या आधारें कोल्हापुरांनील "[illegible]नत" कवीनें प्रस्तुत काव्य साकी वृत्तांत रचिलें आहे. "रम्भासुषेणवियोग" हें चित्र यांतील कवितांप्रमाणेंच सुंदर आहे. पुस्तक कोल्हापुरांतील **जैनेंद्र** छापखान्यांत सुबक रीतीनें छापलें असून किंमत ३ आणे आहे.

४. Some creticisms (Published and Unpublished) on Prof. Ranade's 20th Century English Marathi Dictionary. सात वर्षांपूर्वी सुरू केलेल्या रा. रा. निळकंठ बी. रा[illegible]डे, बी. ए. यांच्या इंग्रजी मराठी कोशाचें काम फार मंदगतीनें चाललें आहे, आणि त्यांत चुकाही असतात, अशी तक्रार मि. कोटक यांनीं Advocate of India या दैनिक पत्रांतून केली. त्यासंबंधानें प्रकाशित झालेला आणि अप्रकाशित असलेला पत्रव्यवहार मि. कोटक यांनीं आतां छापून काढला आहे. तो त्यांच्याकडे रास्त्याची पेठ, घर नं. ७६, पुणें, या पत्त्यावर मागितल्यास मिळेल. कोटक यांच्या तक्रारीस अगदींच जागा नाहीं असें नाहीं. तथापि असलीं कामें पुष्कळशीं लोकाश्रयावर अवलंबून असतात, आणि आपले लोक अशून असल्या बाबतींत अनुदार असतात, इकडे लक्ष दिल्यास रानडे यांची कृति कांहींशी क्षम्य वाटेल.

५. मुंबई ग्रंथसंग्रहालयाचा **बारावा वार्षिक वृत्तांत**—जुलै १९१० अखेर. हा वृत्तांत ग्रंथसंग्रहालयाच्या चालकांस समाधानकारक असाच आहे. गेल्या वर्षीची शिल्लक ९१६ रु. होती, ती यंदा १५८५ आहे. संग्रहालयशाखेंत ४४३२ आणि वाचनालयशाखेंत ५०३७, मिळून संस्थेपाशीं एकंदर ग्रंथसंग्रह आतां ९४६९ झाला आहे. स्वतांची इमारत असावी ह्मणून संग्रहालयानें जवळ असलेल्या रकमेंत २००० रुपये कर्जाऊ घालून ६१०० रुपयांची जागा खरेदी केली आहे. इमारत उभारण्यास आणखी २५००० रुपये लागतील असा अंदाज आहे. ही रकम मिळण्यासाठीं संग्रहालयाचे चालक मराठी वाङ्मयाच्या अभिमान्यांस विनंती करीत आहेत. ती सफल होवो.

६. **नाटकविषयक व्यापक विचार**—हा निबंध रा. सा. गोपाळ वामन वापट, एल. एल. बी. यांनी लिहिला असून, तो मूळ **रंगभूमि** मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झाला. आतां तो इतर वाचकांच्या सोईसाठी स्वतंत्र पुस्तकरूपानें काढला आहे. यांतील विचार नाटककार, नाटकमंडळ्या आणि इतर नाटकप्रिय जन यांनी अवश्य माहित करून घेण्यासारखे आहेत.

७. **मनोरंजनाचा दिवाळीचा अंक**—गेल्या वर्षाप्रमाणें यंदांही निघाला आहे. मनोरंजनकारांची [illegible]टूम वार्षिक होऊं पहाते आहे–आणि याबद्दल संपादकां[illegible] अभिनंदन करावें तेवढें थोडेंच. गेल्या वर्षापेक्षां यंदां चि[illegible] ज्यास्त आहेत. आतां चित्रांची निवड निर्दोष नसेल ज्यांचीं चित्रें येणें योग्य होतें तीं आलीं नसतील, अ[illegible]थवा ज्यांचीं न आल्यास चाललें असतें अशीं आल[illegible] असतील. त्याचप्रमाणें "वधूवरांच्या लग्नाच्या वयो[illegible]मर्यादेच्या" संबंधानें ज्यांचीं मतें छापलीं आहेत त्यां[illegible]तील बरींचशीं न छापलीं असतीं तरी चाललें असते याप्रमाणें जरी मतभेद असला तरी मनोरंजनकारांच[illegible] प्रयत्न स्तुत्यर्ह आणि अनुकरणार्ह आहे याबद्दल को[illegible]णाचाही मतभेद असूं शकणार नाहीं, ह्मणून अधिक[illegible] आश्रयाबद्दल त्यांनीं जी महाराष्ट्रवाचकवर्गाकडे याचना केली आहे ती सफळ होवो असें आह्मी मनापासून इच्छितों.



## जाहिरात.

खालीं लिहिलेलीं पुस्तकें मुंबई इलाख्याचे डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं बक्षिसांसाठीं आणि शाळा—लायब्ररयांसाठीं मंजूर केलीं आहेत.

**गीतार्थसार**—या पुस्तकांत (कै.) रा. रा. वामन आबाजी मोडक, बी. ए. यांनीं भगवद्गीतेच्या १८ अध्यायांचें सुरस भाषेमध्यें सार काढिलें आहे, आणि विशेष स्पष्टीकरणार्थ टीका लिहिली आहे. किं. ४ आणे.

**श्रीमहाबळेश्वर वर्णन**—महाबळेश्वराचें धार्मिकदृष्ट्या आणि ऐतिहासिकदृष्ट्या यांत सुरेख वर्णन दिलें आहे. स्थलवर्णनात्मक यासारखें दुसरें पुस्तक मराठींत क्वचित् आढळेल. ग्रंथकार (कै.) रा. रा. यशवंतराव आनंदराव उदास, बी. ए. किं. ८ आणे.

**भ्रांतिकृत चमत्कार**—शेक्सपियर कवीच्या Comedy of Errors या नाटकाच्या आधारें हें नाटक (कै.) रा. ब. श्रीराम भिकाजी जठार बी. ए. आणि रा. सा. बजाबा रामचंद्र प्रधान यांनीं रचिलें. अत्यंत सुरस आणि मनोरंजक आहे. किंमत ६ आणे.

**बालशिक्षण**—रा. रा. गणेश जनार्दन आगाशे, बी. ए. यांनीं इंग्रजी ग्रंथाच्या आधारानें रचिलें. 'किंडर गार्टन' शिक्षणपद्धतीबद्दल यांत सुरेख माहिती दिली आहे. किं. ३ आणे.

**सुंदरेची संक्रांत**—वरील ग्रंथकारानें रचिलेली एक सुबोध आणि सुरस गोष्ट. किं. दीड आणा.

**व्हिक्टोरिया महाराणीचें चरित्र**—(कै.) रा. रा. गणेश भिकाजी गुंजीकर, बी. ए. यांनीं लिहिलें. महाराणीच्या जन्मापासून तिच्या राज्यारोहणापर्यंत यांत सुरस कथा सांगितली आहे. किं. ३ आणे.

**दानत**—स्माइल्स साहेबांच्या Character या सुंदर पुस्तकाच्या प्रथम भागाच्या आधारें वरील ग्रंथकारानेंच रचिलें. किं. ३ आणे.

**स्वपराक्रम**—स्माइल्स साहेबांच्या Self-Help या पुस्तकाच्या पहिल्या भागाचें रूपांतर रा. रा. गणेश भिकाजी गुंजीकर यांनीं केलें. स्वतःच्या कर्तबगारीनें मनुष्यास काय काय साध्य करून घेतां येतें, हें यांत सुरेख रीतीनें सांगितलें आहे. किं. ४ आणे.

**कुटुंबवत्सल**—ही बोधपर गोष्ट इंग्रजीच्या आधारें वरील ग्रंथकारानेंच लिहिली आहे. एका कुटुंबवत्सल माणसाच्या जन्माची कहाणी यांत चटकदार रीतीनें सांगितली आहे. किं. २ आणे.

**मोचनगड**—मराठींतील ही उत्तम कादंबरी कै. रा. रा. रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनीं लिहिली. मुळांतला थोडा भाग मुंबई शाळाखात्याची सूचनेप्रमाणें कमी करून पुस्तकाची किंमत १२ आण्यांऐवजीं १० आणे केली आहे.

**ब्रिटिश राज्यव्यवस्था**—इंग्लिशांच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप यांत थोडक्यांत पण सुरेख रीतीनें सांगितलें आहे. ग्रंथकार रा. सा. शिवराम सिताराम वागळे, बी. ए., एल. एल. बी. आ. दुसरी. किं. ८ आणे.

**बेकनचे निबंध**—सुधारलेली दुसरी आवृत्ति. वरील ग्रंथकारानेंच मुळाबरहुकूम हें भाषांतर केलें आहे. विद्यार्थ्यांस आणि इतरांसही यांचें वाचन फार फायदेशीर होईल. किं. १२ आणे.

**सिसरोकृत नीतिविषयक चार निबंध**-रा. सा. वागळे यांनीं हे चार निबंध इंग्रजींतून मराठींत उतरले आहेत. किंमत ४ आणे.

**स्वतःचा प्रयत्न**—रा. सा. विष्णु मोरेश्वर महाजनि, एम्. ए. यांनीं स्माइल्सच्या Self-Help या ग्रंथाच्या प्रथम भागाचा आधार घेऊन हें सुंदर पुस्तक लिहिलें आहे. किं. ३ आणे.

**कुसुमांजलि**—इंग्रजी कवींच्या काव्यांतील सुरस चुटक्यांचें हें सुरस मराठी रूपांतर रा. सा. महाजनि यांनीं केलें आहे. संग्रह फार नामी आहे. किं. ४ आणे.

**अभिनव कादंबरी**—बाणाच्या कादंबरीची कथा या काव्यामध्यें रा. रा. गंगाधर रामचंद्र मोगरे यांनीं थोडक्यांत आणि चटकदार रीतीनें दिलेली आहे. ती कथा जाणण्यास या काव्याचा जसा उपयोग होईल तसा दुसऱ्या पुस्तकाचा होणार नाहीं. उत्तम मराठी कवितेचा ज्यांस नमुना पहावयाचा असेल त्यांनीं या अभिनव कादंबरीचा अवश्य संग्रह करावा. किं. ४ आणे.

**पद्यात्मक लघुहितोपदेश**—(कै.) रा. रा. विनायक यशवंत वेर्डे यांनीं रचिलेल्या नीतिपर कविता. मुलांच्या हातीं देण्यास अगदीं योग्य पुस्तक. किं. २ आणे.

**श्री शिवछत्रपतींचें सप्त-प्रकरणात्मक चरित्र**—(मल्हार रामराव चिटणीसकृत.) शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीची यांत इत्थंभूत हकीकत दिली आहे. आवृत्ति दुसरी. किं. १ रु.

**सार्वजनिक आरोग्य**—डॉ. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांनीं मूळ इंग्रजीवरून केलें. किं. १२ आणे

☞ हीं पुस्तकें "**विविधज्ञानविस्तारचे** म्यानेजर, फणसवाडींत अग्निहोत्र्याच्या वाड्यासमोर, मुंबई," या पत्त्यावर मागवावीं.

Printed by G. N. Kulkarni at his Karnatak Press, No. 7, Girgaon Back Road, Bombay

